

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)




महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com





# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

छपाई, कागद वगैरेंच्या वाढलेल्या खर्चामुळे 'नवभारत' ची वार्षिक वर्गणी ऑक्टोबर २०१४ पासून रू. ४००/- इतकी करण्यात आलेली आहे. कृपया याची नोंद घ्यावी. वर्गणीदार आणि वाचक यांनी सहकार्य करावे अशी विनंती आहे.

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६८ । अंक ६ । मार्च २०१५
फाल्गुन/चैत्र शके १९३६-३७
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ३०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# नवभारत

## मार्च २०१५

## अनुक्रमणिका



## श्रद्धांजली

## प्रा. सीताराम रायकर : मार्गदर्शक आणि मनमिळाऊ व्यक्तिमत्त्व

आमच्या प्राज्ञपाठशाळामंडळाचे उपाध्यक्ष, इंग्रजीचे नामवंत प्राध्यापक, साहित्यिक आणि विचारवंत असे प्रा. सीताराम रायकर आम्हा सर्वांच्या आठवणीत कायमचे राहतील. प्राज्ञपाठशाळामंडळाचे तत्कालीन अध्यक्ष प्रा. मे. पु. रेगे यांनी रायकर सरांना आग्रहाने प्राज्ञपाठशाळेच्या संचालक मंडळात येण्यास आमंत्रित केले आणि सचिवपदाची धुरा त्यांच्याकडे सोपविली. त्यावेळी मंडळाचे आर्थिक हिशेब व नियोजन यांच्यात सुसुत्रता आणण्याचे महत्त्वाचे काम त्यांनी केले. त्याचप्रमाणे मंडळाची अभ्यास शिबिरे व चर्चासत्रे आयोजित करून त्यांनी वेळोवेळी मार्गदर्शन केले. प्राज्ञपाठशाळामंडळाच्या प्रकाशनांमध्येही त्यांचा महत्त्वाचा सहभाग होता. सौजन्य, सहृदयता आणि सहकार्य ही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची वैशिष्ट्ये होती. त्यांच्या निधनाने प्राज्ञपाठशाळामंडळाचा एक आधारस्तंभ आम्ही गमावलेला आहे. या मंडळाचे सर्व सभासद रायकर कुटुंबियांच्या दु:खात सहभागी आहेत.

## श्रद्धांजली

मे २०१४ मध्ये संपन्न झालेल्या 'धर्म आणि विज्ञान' चर्चासत्रातील सहभागी कै. श्री. रवींद्र गोडबोले यांचे दि. ११ जून २०१४ रोजी दु:खद निधन झाले. त्यांना प्राज्ञपाठाशाळामंडळ, वाई यांच्यातर्फे श्रद्धांजली.

'धर्म आणि विज्ञान' चर्चासत्रात त्यांनी मांडलेल्या विचारांवर आधारित लेखाचा या विशेषांकात समावेश केला आहे.


अनुक्रमणिका

# विवेकबुद्धीला आवाहन

अतीश दाभोलकर

अनुवाद : अशोक कृष्णाजी जोशी

महाराष्ट्र सरकारने २०१३ सालचा १६ नं. चा जो काळ्या जादूसंबंधीचा ऑर्डिनन्स काढला आहे, त्याचे महत्त्व मी माझ्या "अ हिस्टॉरिक चॉइस" या लेखात सांगितले आहे. मी असे म्हटले आहे की, 'या ऑर्डिनन्सचे कायद्यात रूपांतर होण्यासाठी नागरिकांनी प्रयत्न करणे आवश्यक आहे.' त्यासंबंधी त्याच लेखात मी म्हटले होते की, 'नरेंद्र दाभोलकरांच्या २० ऑगस्टला झालेल्या हत्येनंतर लगेच तातडीचा ऑर्डिनन्स म्हणून महाराष्ट्र मंत्रिमंडळाने हा ऑर्डिनन्स पास केला.' दाभोलकरांनी एक दशकभर हे विधेयक सम्मत व्हावे म्हणून अथक प्रयत्न केले. त्यांनी दोन दशके महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे नेतृत्व करून लोकांमधली अंधश्रद्धा दूर करायचे प्रयत्न केले. या विधेयकाचा हेतू सामाजिक जागृती करणे व सामाजिक जाणीव निर्माण करणे हा आहे. तसेच लोकांतील अज्ञानाचा गैरफायदा घेऊन समाजात दुष्ट व वाईट प्रथा पसरवणाऱ्यांपासून सर्वसामान्य माणसाचे रक्षण करणे, समाजात चांगले व सुरक्षित वातावरण तयार करणे हाही उद्देश आहे. या विधेयकासंबंधी सतत गैरसमज पसरवण्यात येत आहेत की, हे हिंदूंच्या, स्वदेशीच्या व धर्माच्या विरोधी आहे. सद्‌हेतू बाळगणाऱ्या नागरिकांनाही तसे सांगण्यात येत आहे. या गैरसमजाचा काही भाग विधेयकविरोधी खोट्या व आक्रमक प्रचाराशी निगडित आहे. या लेखाद्वारे हा गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. निश्चित तत्त्वज्ञानाचे पाठबळ असलेला अंनिसचा कार्यक्रम काय आहे हे स्पष्ट करणे आणि या विधेयकामागचा हेतू काय आहे, याची चर्चा या लेखात केली आहे. कोठलाही धार्मिक विज्ञानवाद – इवँजेलिकल सायंटिझम– पसरवणे किंवा आपल्या पंथाचा प्रचार करणे हे अंनिसचे उद्दिष्ट नाही. अंनिसच्या हेतूतच तसे करणे बसत नाही. अंनिसचे तत्त्वज्ञान काटेकोर स्वरूपाचे आहे. या लेखातल्या चर्चेमुळे आपल्या समोरचा नेमका संघर्ष काय आहे, हे स्पष्ट होईल. हा काही धर्म व विज्ञानातला संघर्ष नाही; तर लोकांमधल्या अज्ञानाचा गैरफायदा घेऊन त्यांचे शोषण करणारी प्रवृत्ती व विवेक यांमधील हा लढा आहे. सर्व जगभर अज्ञानाविरोधी जो लढा चालू आहे तो महाराष्ट्रातही व्हावा, याच उद्देशाने हे विधेयक मांडण्यात येत आहे. फक्त भारतात किंवा विशिष्ट धर्मात विवेकविरोध होत आहे असे नसून असे सर्वत्र होत आहे. उत्क्रांतिवादाने पुढे केलेला सबळ पुरावा नाकारून अमेरिकेमध्ये निर्मितिवाद – क्रिएशनिझम – पसरत आहे व त्यासाठी बायबलचा आधार घेतला जात आहे. हवामानाचा अभ्यास करणाऱ्या पर्यावरणवादी वैज्ञानिकांना मृत्यूची शिक्षा मिळेल अशा धमक्या सर्व जगभरच दिल्या जात आहेत. वातावरणातली हवा अधिकाधिक उष्ण होत आहे, हे पुराव्यानिशी सिद्ध करणाऱ्या वैज्ञानिकांना या धमक्या वातावरण अधिक उष्ण करणाऱ्या तेल कंपन्यांच्या पित्त्यांकडून मिळत आहेत. काही मुस्लिम राष्ट्रांत अनिष्ट तालिबानी प्रवृत्ती वाढत आहे. स्त्रियांचे मूलभूत मानवी हक्कच तिथे नाकारण्यात येत आहेत.

अशा वातावरणाचा परिणाम म्हणून नरेंद्र दाभोलकरांचा खून झाला. खुनाची बातमी ऐकून माझे अनेक सहकारी हेलावून गेले. त्या सहकाऱ्यांपैकी कोणालाही अंनिसच्या कामाची काहीही माहिती नव्हती. चेन्नईच्या इन्स्टिट्यूट ऑफ मॅथेमॅटिकल सायन्सेसमधल्या वैज्ञानिकांच्या एका गटाने महाराष्ट्राच्या या विधेयकाचे राष्ट्रीय स्तरावर काय महत्त्व आहे, यासंबंधी पुढील शब्दांत निवेदन केले – "महाराष्ट्र मंत्रिमंडळाने अखेरीस २२ ऑगस्ट (२०१३ ला) दाभोलकरांना हवा असलेला अंधश्रद्धाविरोधी अध्यादेश संमत केला. या अध्यादेशावर विधानसभेत तपशीलवार चर्चा करून विधानसभा ते विधेयक संमत करेल व त्याचे कायद्यात रूपांतर होईल,

अशी आम्हाला आशा आहे. इतर राज्यांतही असे घडावे. तमिळनाडूला विवेकनिष्ठेची फार मोठी व ऐतिहासिक परंपरा आहे. तिथेही असे विधेयक संमत होईल, अशी आम्हाला आशा आहे."

पॅरिसमधला प्रसिद्ध फिझिसिस्ट व डिराक पदकाचा मान मिळविणारा वैज्ञानिक एदुआर्द ब्रेझिन याची मेल म्हणते, "नरेंद्र दाभोलकरांसारख्या आदर्श व्यक्तीसंबंधी बातमी वाचून वाईट वाटले. नरेंद्र दाभोलकरांनी जे लढे लढवले, त्यामुळे अनेक वैज्ञानिकांत एक सहभावना – एम्पथी – निर्माण झाली होती. – अनेक भारतीय कुटुंबांत आडनावे एकसारखीच असतात. तुमचेही आडनाव तेच आहे. ही वाईट बातमी तुमच्या संबंधितांविषयी नसावी, असे मला वाटले." ८० वर्षांपूर्वी फ्रान्समध्ये स्थापन झालेल्या युनिअन रॅशनॅलिस्ट या संस्थेने एक निवेदन प्रसिद्ध करून या कृत्याचा निषेध केला. (या संस्थेच्या पूर्वाध्यक्षपदी लँगरीन व जोलिअट क्यूरी हे मोठे शास्त्रज्ञ होते.)

अशा अनेक आंतरराष्ट्रीय संस्थांनी सहानुभूती व संवेदना व्यक्त केली. याउलट चित्र असे दिसले की, अंनिसला विरोध करणाऱ्या भारतीय शक्ती हे विधेयक कायद्यात रूपांतरित होऊ नये म्हणून प्रयत्न करीत राहिल्या. विधेयकाला विरोध करणाऱ्यांना वाटत होते की, विज्ञान व धर्म हे परस्परविरोधी आहेत व विज्ञान मानवी मूल्यांविरोधी आहे. ह्या दृष्टीने पाहिले तर सर्व नास्तिक हे सुखवादी असतात व कोणतीही मानवी मूल्ये ते मानत नाहीत. शास्त्रीय पद्धती स्थानिक परंपरा नष्ट करणाऱ्या आहेत व विज्ञानाचे हे रूप एक प्रकारचा सांस्कृतिक वसाहतवाद आहे, असेही मानले जाते. सर्वदूर पसरवलेल्या या गैरसमजुतीमुळे चांगले हेतू असलेले चांगले नागरिकही अशा गैरसमजुती बाळगतात. हा विज्ञानविरोधी दृष्टिकोण शैक्षणिक क्षेत्रातही आहे. तो फॅशनेबलही झाला आहे. म्हणून गैरसमजुती व भीती यांचा नीट विचार केला पाहिजे, त्यांना सविस्तर उत्तर दिले पाहिजे. अखेरीस हा प्रश्न विज्ञान व धर्म यांच्या नात्याचा, श्रद्धा व अंधश्रद्धा यांच्यातील संबंधाचा व त्यांमधील फरकाचा आहे.

## धर्म व विज्ञान

धर्म व विज्ञान यांत जो संघर्ष दिसतो, तो मुख्यतः हितसंबंधांच्या गुंतागुंतीमुळे झालेला संघर्ष आहे. गॅलिलिओ व त्या वेळचे चर्च यांत जो संघर्ष झाला होता, त्याचे कारण ख्रिस्ताच्या शिकवणुकीप्रमाणे गॅलिलिओ वागत नव्हता हेच केवळ नव्हते. पोपच्या अधिकाराला गॅलिलिओच्या शोधांमुळे आव्हान मिळाले होते. तेच या संघर्षाचे मुख्य कारण होते. मध्ययुगात ख्रिश्चन धर्म कर्मठ झालेला होता. गरीब व शक्तिहीन लोकांकरिता त्या धर्माने सुरुवातीच्या काळात काम करून त्यांचे उत्थान घडवून आणले व रोमन साम्राज्याचा तो अधिकृत धर्म बनला. पण मध्ययुगाच्या काळापर्यंत त्या धर्मामध्ये जडत्व आले होते. सर्व प्रसंगांत माणूस विवेकशक्तीचा आधार घेत नाही; तर तो आपल्या मानसिक शक्तीचा वापर करीत असतो. (असे करताना तो बनत असतो, घडत असतो. हे बनणे त्याच्या व्यक्तिगत इतिहासाचा भाग असते.) या मानसिक शक्तींचा संबंध धर्माशी आहे. पण प्रत्येक धर्मग्रंथाचे वेगवेगळे अर्थ होतात. वेगवेगळ्या व्यक्ती आपल्या समोरील ग्रंथांचे परस्परविरोधी अर्थ लावू शकतात. (या अर्थाने धर्मातील वचने व आज्ञा बऱ्याच लवचीक असतात.) एक वैज्ञानिक म्हणून, एक निरीश्वरवादी म्हणून धार्मिक श्रद्धा वैयक्तिक स्वरूपाच्या असतात असे मी मानतो. आधुनिक काळातील काही मानवतावादी मूल्ये धर्माच्या आरंभकाळात सापडू शकतात.

न्यायाची कल्पना, सर्व माणसे (ईश्वराची लेकरे असेही त्यांना म्हटले जाते) समान आहेत हा समतेचा संदेश, सर्व माणसांना मूलभूत स्वरूपाचे मूल्य आहे, सर्व माणसांची दुःखे समान आहेत हे सर्व धर्मांमध्ये सांगितले आहे. बुद्ध, जीझस, विवेकानंद, गांधी या श्रद्धावानांनी मानवी दुःख व अन्याय दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. श्रद्धा ठेवणाऱ्या श्रद्धावान तसेच अश्रद्ध या दोघांनाही त्यांच्या कामामुळे स्फूर्ती मिळते. वास्तवाच्या प्रांगणात विज्ञान वावरत असते. माणसाच्या प्राचीन अवस्थेत तो केवळ फळे गोळा करणारा प्राणी होता. त्याचा मेंदू जसा विकसित होत गेला, वाढत गेला, तशी त्याला निसर्गाचे अंतरंग पाहण्याची, आकाशातील आकाशगंगा पाहण्याची, सगळे विश्वच जाणून घेण्याची,

अतिसूक्ष्म अणू व पेशी पाहण्याची शक्ती मिळाली. माणसाने मोठ्या प्रयत्नाने मिळवलेले हे वैज्ञानिक ज्ञान मौलिक आहे. तो माणसाचा अर्थपूर्ण ठेवा आहे. याला एका अर्थपूर्ण अनुबंधात बांधण्याचे काम माणूस करीत आहे. वैज्ञानिकांची निसर्गनियम समजून घ्यायची धडपड त्यांच्या धार्मिकतेचा, अतिभौतिकतेचा आविष्कार म्हणून पाहता येईल, असे आइनस्टाइनना वाटले. ते म्हणतात, "आपल्या व्यक्तिगत स्वार्थापलीकडे व मूल्यांपलीकडे जाऊन, शक्य असेल तेवढे आपल्या व्यक्तिगत इच्छांपासून मुक्ती मिळवणाऱ्याला मी धार्मिक माणूस व उन्नतावस्था प्राप्त झालेला माणूस मानेन."

व्यक्तिगत इच्छांपलीकडे जाऊन संगीताची साधना करणारी, कुटुंबवत्सल, धर्मातला अर्थ शोधणारी माणसे धार्मिक असतात. नीट कुंकू लावून, कुराण वाचन करून, आईने दिलेला ताईत गळयात बांधून (माणसाला) स्फूर्ती मिळू शकते. विचारांचे, आविष्काराचे, श्रद्धांचे, विश्वास बाळगण्याचे व कोणताही धर्म पाळण्याचे स्वातंत्र्य आपल्या राज्यघटनेने दिलेच आहे. वास्तव व सर्वांना मान्य झालेला तर्क आपल्या वैयक्तिक आवडीनिवडी व विचार यांचा आडोसा घेऊन आपण नजरेआड करू शकत नाही. आपल्या व्यक्तिगत श्रद्धा व जुनाट चालीरीती यांचा आधार घेऊन दुसऱ्यांचे स्वातंत्र्य आपल्याला संकुचित करता येणार नाही. तसे केल्यास संघर्ष अटळ ठरतो.

या संदर्भात महाभारताचे उदाहरण घेता येईल. माद्री सती गेली या कथेचा आधार घेऊन सतीप्रथेचा पुरस्कार आपण करू शकत नाही. दुसरे याच प्रकारचे उदाहरण ख्रिस्ताच्या शिकवणुकीचे घेता येईल. या शिकवणुकीपासून स्फूर्ती घेतली जाते. गुलामांनी धन्याचे आज्ञाधारक सेवक असावे असे जे संत पॉलने बायबलमध्ये म्हटले आहे, त्याच्याशी सहमत होऊन गुलामगिरीचे समर्थन आपण करू शकणार नाही व धनी-गुलाम नाते कसे असावे, हे ठरवू शकणार नाही.

पर्यावरणविज्ञानाला व जागतिक उष्णतावाढविरोधी आंदोलनाला विरोध करणाऱ्या तेलकंपन्यांच्या कारवायांकडे याच दृष्टीने पाहिले पाहिजे. धार्मिकतेचा व पारमार्थिकतेचा बाजार मांडून लोकांना फसवले जाते. स्त्रियांना समाजात दुय्यम स्थान दिले जाते याविरुद्ध अंनिस चळवळ करीत आहे, म्हणून अंनिसला विरोध केला जात आहे.

धर्म एक सामाजिक तंत्रज्ञान आहे म्हणून त्याच्याकडे पाहिले पाहिजे. इतर तंत्रज्ञानांप्रमाणे हे तंत्रज्ञानही माणसाचे भले करण्यासाठी वापरता येते किंवा त्याचे शोषण करण्यासाठीही वापरता येते. इतर तंत्रज्ञानांप्रमाणे नवे ज्ञान निर्माण करण्यासाठी व नव्या सामाजिक परिस्थितीशी जुळवून घेण्यासाठी ते वापरता येते. स्वार्थी हेतू असलेले लोकच समाजातले अज्ञान पोसत असतात. आपण दिलेली उदाहरणे स्पष्ट करतात की, खरा संघर्ष धर्म व विज्ञान यांतला नाही, तर विवेक व अज्ञान यांतला हा संघर्ष आहे. अंनिस या संघटनेचा आजवर विविध स्तरांवर विस्तार झाला आहे, विकास झाला आहे, वेगवेगळे आविष्कार झाले आहेत. या संघटनेचा उद्देश मात्र तोच राहिला आहे.

दोन वर्षांपूर्वी एजंस फ्रांस-प्रेसला मुलाखत देताना नरेंद्र दाभोलकर म्हणाले की, "या संपूर्ण विधेयकात कुठेही देव वा धर्म यांचा एका शब्दानेही उल्लेख केलेला नाही. कोणत्याही धर्माचे पालन करण्याचे स्वातंत्र्य भारतीय राज्यघटना कोणालाही हिरावून घेऊ देत नाही. हे विधेयक माणसांचे शोषण करणाऱ्या व खोटे सांगणाऱ्या गोष्टींविषयी आहे."

अंनिसची ही भूमिका रिचर्ड डॉकिन किंवा श्रीराम लागू यांच्या देव व धर्म या कल्पनांवर हल्ला करणाऱ्या विवेकवादी भूमिकेपेक्षा वेगळी आहे. अनेक लोकांना ही अंनिसची भूमिका का भावली हे स्पष्ट करणारा हा दोन भूमिकांतला फरक आहे. अंनिसची भूमिका व विधेयकातील तरतुदी यांविषयीचे गैरसमज आतातरी दूर व्हावेत. अंधश्रद्धा व शोषणविरोधी असणाऱ्या सर्व विवेकवाद्यांना जोडणारी अंनिसची ही भूमिका एक समान धागा ठरावी.

**विवेक आणि अज्ञान**

अनेकदा श्रद्धा व अंधश्रद्धा यांत नेमका फरक काय आहे, हा प्रश्न विचारला जातो. त्याचे उत्तर असे देता येईल, जी श्रद्धा वस्तुस्थिती व सर्वमान्य:तर्कविरोधी असते, ती अंधश्रद्धा असते. मग विश्वास, वस्तुस्थिती किंवा वास्तव वा सत्य या पातळीला एखादी श्रद्धा कशी पोचते, हा प्रश्न आपोआपच उपस्थित होतो. या प्रश्नाचे

उत्तर महत्त्वाचे असून सर्व विज्ञानाचा पाया असे त्याचे स्वरूप आहे. प्रत्येक मानवी प्रयत्नाला विश्वास व श्रद्धा यांचा आधार असतो. श्रद्धेचा किंवा विश्वासाचा पाया नेहमीच विवेकबुद्धी नसते. विज्ञान जेव्हा नवा शोध घेते, तेव्हा त्या शोधामागे काही विश्वास व श्रद्धा असते. समाजाने शोधांचे हे मूळ स्वीकारणे आवश्यक असते. पण प्रत्येक शोध काही वास्तवात उतरत नाही. अगदी कठोर चाचण्यांतून, टीकाटिप्पण्यांतून नव्या शोधाला जावे लागते. मगच तो वास्तवाच्या कसोटीवर उतरतो. त्याला वैज्ञानिक मान्यता मिळते. मोठे यशही मिळू शकते. संख्याशास्त्रीय कसोटीही तो पास करतो. हे वास्तव माहीत नसल्यामुळे बऱ्याचदा सर्वसामान्य लोकांच्या मनात वैज्ञानिक शोधांबद्दल गोंधळ असतो. विज्ञानात निश्चित स्वरूपाचे किंवा त्रिकालाबाधित विधान केले जात नाही. आत्मविश्वासाच्या वेगवेगळ्या पातळ्यांवर वैज्ञानिक विधाने असतात. एखादी पैज लावल्यासारखी ती विधाने असतात. उदाहरणार्थ, क्विनाईनने मलेरिया बरा होतो हा डॉक्टरांचा विश्वास. अनेक वैज्ञानिक चाचण्यांवर व पुराव्यांवर हा विश्वास आधारलेला असतो. क्विनाईन दिलेल्या व न दिलेल्या जवळजवळ १ हजार रुग्णांच्या बाबतीत हे आढळते की, क्विनाईन दिलेले ९९९ रुग्ण बरे होतात व केवळ एकाच रुग्णाला क्विनाईनचा उपयोग होत नाही. एवढ्या मोठ्या पुराव्यावर हा विश्वास आधारलेला आहे. उलट, केमोथेरपीचे उदाहरण सांगते की, केमोथेरपीने पन्नास टक्केच रुग्ण बरे होतात. वैज्ञानिक पुराव्याच्या सत्यता पडताळणीच्याही वेगवेगळ्या पातळ्या असतात.

मी हाय एनर्जी फिजिक्समध्ये काम करतो. या ज्ञानशाखेत एखादी गोष्ट सत्य आहे, वास्तव आहे असे जाहीर करणे बरेच कठीण असते. वास्तवाच्या कसोटीवर संख्याशास्त्रीय दृष्टीने उतरण्याचे प्रमाण यात कमी असते. जिनिवातल्या सर्न प्रयोगशाळेत केला गेलेला हिग्ज बोसान पार्टिकल किंवा विश्वकण अस्तित्वात असतात हा प्रयोग उदाहरण म्हणून घेऊ या. गेल्याच वर्षी हे विश्वकण अस्तित्वात आहेत असे जाहीर करण्यात आले. पण पन्नास वर्षे आधी शास्त्रज्ञांना जाणवले होते की, हे कण–पार्टीकल– अस्तित्वात आहेत. निसर्गात आढळणाऱ्या सिमेट्रीवर व तार्किक सुसंगती – लॉजिकल कन्सिस्टन्सी– वर हा विश्वास आधारलेला होता. हा शास्त्रीय विश्वास हजारो वैज्ञानिकांच्या सहकार्याने व कित्येक दशकांच्या प्रयोगांतून तपासण्यात आला व जाहीर करण्यात आले की, तसे विश्वकण आहेत. गेल्या वर्षीच त्यासंबंधी नोबेल पारितोषिक देण्यात आले. पण हा सत्य म्हणून या शोधाला दिलेला दर्जा एक भागिले दशलक्ष याच प्रमाणात सत्य आहे.

सर्न प्रयोगशाळेतल्या वैज्ञानिकांनी आपला शोध जाहीर करण्याआधी अधिक माहिती (डेटा) मिळण्याची वाट पाहिली. कारण त्यांना माहीत होते की, आपण लावलेला शोध एक हजारांत एक याच प्रमाणात सत्याच्या कसोटीवर उतरणारा आहे. विज्ञानाची विश्वासार्हता राखण्यासाठी तशी खबरदारी आवश्यकच होती. फेनमन या वैज्ञानिकाने म्हटले की, स्वतःला फसवणे सोपे असले, तरी तुम्ही स्वतःला फसवू नका.

सर्नच्या जटिल अशा प्रयोगात स्वतःला फसवण्याची संधी मोठ्याच प्रमाणात उपलब्ध होती. चुकीचे तर्क लढवून खोटे निष्कर्ष–कन्क्लुजन्स– काढणे सहज शक्य होते. या मोहांपासून स्वतःचे रक्षण करून वैज्ञानिकांनी उपलब्ध माहितीचे संख्याशास्त्रीय विश्लेषण करण्याचे कठीण काम पार पाडले. याचा अर्थ हा की, सांख्यिकी प्रमाणावर विश्वास व वास्तव, श्रद्धा व सत्य यांतला फरक अवलंबून आहे. व्यक्तिगत विश्वासावर तो फरक आधारला जाऊ शकत नाही. पूर्णार्थाने निश्चितता सापडत नसली तरी समाधानकारक प्रमाणात वैज्ञानिक जगात ती सापडते. डोंगराच्या कड्यावरून उडी मारणारा माणूस मरणार हे विधान जेवढे निश्चित स्वरूपाचे आहे, तेवढे सत्य व निश्चितता वैज्ञानिक शोधात व वैज्ञानिक जगात असते.

जसजशी नवी माहिती मिळते, तसतसे आपण बाळगलेला विश्वास सत्य ठरणार की असत्य सिद्ध होणार, हे ठरते. सत्य हे स्थिर नसते; तर बदलणारे असते. सर्वांना मान्य असलेल्या गोष्टी बदलत असतात. शास्त्रीय प्रमेये व धर्माज्ञा कालबाह्य ठरतात. जग काही हजार वर्षे जुने आहे किंवा ते शेषनागाने आपल्या फण्यावर धरले ही पुराणातली कथा आज कालबाह्य ठरली आहे. माणूस प्रकाशापेक्षा जास्त वेगाने प्रवास करू शकेल,

हा न्यूटनचा विश्वास कालबाह्य ठरला आहे. कालबाह्यतेचा निकष वापरला नाही, तर अंधश्रद्धेला खतपाणी घातल्यासारखे होईल. ही चर्चा अमूर्त स्वरूपाची असली, तरी तिचा संबंध प्रत्यक्ष जीवनाशी जोडणे शक्य आहे. अंधश्रद्धाविरोधी विधेयकातील ९ वा भाग सर्पदंशाने चढणारे विष जादूटोण्याने उतरवता येते या अंधश्रद्धेसंबंधी आहे. कालबाह्य वाटणारी ही अंधश्रद्धा भारताच्या कोठल्यातरी दूरवरच्या कोपऱ्यातली अंधश्रद्धा आहे, असे वाटेल; पण दुर्दैवाने आपला समज खरा नाही. उदाहरण द्यायचे तर स्वदेशी चळवळीतले, शहरात वाढलेले व शहरात अनेक अनुयायी असलेले राजीव दीक्षित यांचे देता येईल. आपल्या भाषणात दीक्षित सांगतात की, सर्पदंशावर होमिओपॅथीमधले नाजा हे औषध लागू पडते. अशा प्रकारचे वक्तव्य सार्वजनिक आरोग्यव्यवस्थेच्या दृष्टीने धोकादायक आहे. हे मत त्यांचे वैयक्तिक व दृढ श्रद्धा असलेले मत राहत नाही. आपल्या दाव्याचे समर्थन करण्यासाठी तो जो पुरावा देतात, तो वास्तवाशी ताडून पाहिला पाहिजे. त्या पुराव्याची सत्यासत्यता हा आपल्या समोरचा खरा प्रश्न ठरतो. सी व्हिटॅमिन सर्दी बरी करण्यासाठी औषध म्हणून काम करते या दाव्याचा विचार श्रद्धा किंवा विश्वासापासून विज्ञान वास्तवाकडे कसा प्रवास करते या प्रक्रियेच्या संदर्भात केला पाहिजे. लिनस पॉलिंग या नोबेल पारितोषिक मिळवणाऱ्या अतिशय हुशार व पायाभूत स्वरूपाचे काम केलेल्या प्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञाच्या वक्तव्याचे इथे उदाहरण घेऊ. त्याचा या दाव्यावर फार विश्वास होता व त्याने या उपायासंबंधी एक पुस्तकही लिहिले आहे. पण पॉलिंगने मिळवलेल्या कीर्तीचे दडपण वैज्ञानिक समुदायावर आले नाही. शास्त्रीय कसोटीवर तो दावा टिकला नाही. त्याचा विश्वास व श्रद्धा त्या समुदायाने सत्य आहे, असे मानले नाही. पुढली अनेक वर्षे पॉलिंगने आपला दावा खरा आहे असे मानले; पण असे मानणे त्याची अंधश्रद्धाच होती. आजदेखील अनेकांकडून असाच दावा केला जातो; पण तो अंधश्रद्धा या गटातच मोडतो.

एक स्पष्ट होते की, अंधश्रद्धेचा धर्माशी काही संबंध नाही. प्रत्यक्ष प्रमाणाशी सत्यासत्यतेचा संबंध नाही. धार्मिक अंधश्रद्धा असो की वैज्ञानिक श्रद्धा असो, त्यातील प्रत्येक दाव्याचे बारकाईने परीक्षण केले जाते, तेव्हाच त्याला सत्य व वास्तव मानण्यात येते. पॉलिंग, शंकराचार्य, ख्रिश्चन धर्मगुरू पोपने वा दीक्षित यांनी एखादे प्रमेय व सिद्धान्त मांडले, तरी ते चूक मानले जाऊ शकते.

एखाद्या श्रद्धा किंवा विश्वासाच्या बाजूने सबळ व भक्कम पुरावा असला, तर तिला आपण वस्तुस्थिती किंवा सत्य असे म्हणतो. पण एखाद्या श्रद्धेविरुद्ध, विश्वासाविरुद्ध सबळ व भरपूर पुरावे असले, तर त्या श्रद्धेला आपण अंधश्रद्धा म्हणतो. एखाद्या श्रद्धेविरुद्ध भरपूर पुरावा असेल व मान्यताप्राप्त वैज्ञानिक कसोट्यांवर ती उतरत नसेल, तर तिला आपण चुकीची श्रद्धा असे म्हणतो. (इथे आपण लॉ ऑफ काँजर्वेशनचे उदाहरण घेऊ शकतो.)

आणखी कोणत्याही पुराव्याशिवाय तिला संशयास्पद श्रद्धा असे म्हणता येईल. प्रत्येकाला आपआपली श्रद्धा बाळगण्यांचा अधिकार आहे. वास्तवाला वेगळीच वैश्विकता मिळत असते. ते व्यक्तिगत राहत नाही. इथे जी भूमिका घेतली आहे ती काही प्रसिद्ध बुद्धिवाद्यांच्या- रॅशनॅलिस्ट- भूमिकेपेक्षा वेगळी आहे. इंडिअन रॅशनॅलिस्ट सोसायटीच्या सुवर्णजयंतीचे उद्घाटनपर भाषण करताना पॉल कूर्ट्झ याने क्लिफर्ड या बुद्धिवंताचे वाक्य उद्धृत केले, "अपुऱ्या पुराव्यावर आधारित श्रद्धेवर नेहमी, कुठेही व कोणीही विश्वास ठेवणे योग्य नाही." कूर्ट्झच्या या म्हणण्याशी बहुतांशी सहमत होता आले, तरी त्याचे हे मत पूर्णतः स्वीकारणे अवघड आहे. ते असे मांडणे अधिक स्वीकारार्ह झाले असते- "पुरेसा विरोधी पुरावा असताना एखाद्या श्रद्धेवर, अनुमानावर विश्वास ठेवणे योग्य नाही. ते सर्व काळात व सर्व ठिकाणी चुकीचेच अनुमान असते."

अंधश्रद्धेविरोधी असलेल्या या दोन मतांतला फरक महत्त्वाचा आहे. हिंदूजनजागरण समितीने अंधश्रद्धाविरोधी विधेयकाला अंधश्रद्धाविरोधी विधेयक न म्हणता ते आमच्या धर्मश्रद्धेविरुद्ध आहे, असे म्हटले. त्यांचे हे मत बरोबर नाही. या विधेयकात मांडलेल्या बाराही गोष्टी धर्मश्रद्धेविरुद्ध नाहीत. (त्या अंधश्रद्धेविरुद्ध आहेत.) नरेंद्रला माहीत होते की, मानवी जीवनात श्रद्धेला महत्त्वाचे स्थान आहे, पण अंधश्रद्धेला कोणतेही स्थान नाही.

अंधश्रद्धा वास्तवाच्या कसोटीवर उतरत नाहीत. मानवी शोषणाकरिता अंधश्रद्धेचा उपयोग केला जातो. अंनिसचे तत्त्वज्ञान माणसाच्या विवेकबुद्धीला आवाहन करते व विवेकबुद्धीच या विधेयकाचा पाया आहे. विवेकानंदांनी म्हटले आहे, "अंधश्रद्धा हा आपला मोठा शत्रू आहे...अंधश्रद्धेला फेकून दिले पाहिजे."

**स्वदेशीविरुद्ध नेमके काय असते?**

स्वदेशी चळवळीवर विसंबून काही संघटनांनी अंनिसला पश्चिमेचे एजंट म्हटले. भारतातल्या विवेकवादी चळवळींवर या संघटना टीका करतात. विवेकवादी चळवळी निरीश्वरवादी असून पाश्चात्त्य विज्ञानवादी परंपरेकडून त्या आयात झाल्या आहेत, असे ते म्हणतात. उत्तरवसाहतवादी विचाराचे लोक तर पश्चिमी विज्ञानाची ही मानसिक गुलामगिरी असे मानतात. मी उत्तरवसाहतवादी भूमिकेशी बराच सहमत असलो, तरी त्यांच्या या विचारांशी मला सहमत होता येत नाही. भारतातली निरीश्वरवादी परंपरा फार जुनी, दीर्घ स्वरूपाची व सशक्त आहे. त्या परंपरेकडे हे मत दुर्लक्ष करते. विज्ञान म्हणजे काय व विज्ञान कसे असते, याविषयीदेखील हे मत असणाऱ्या लोकांत मूलभूत स्वरूपाचे गैरसमज आहेत. भारतीय निरीश्वरवादी परंपरेतील लोकायत तत्त्वज्ञान इसवी सन पूर्व एक हजार वर्षे इतके जुने आहे. देवाबरोबर आत्म्याचे अस्तित्वही चार्वाक नाकारत होते. मन या कल्पनेचा आधार भौतिक गोष्टीच आहेत, असे त्यांचे मत होते. हिंदू तत्त्वज्ञानाचा जसा वेद व महाभारत भाग आहेत, तशीच ही चार्वाक परंपरा देशी किंवा स्वदेशी व हिंदू परंपरा आहे. ऋग्वेदात जगाची उत्पत्ती कशी झाली यासंबंधी एक प्रार्थना/ऋचा आहे. ते जग कसे उत्पन्न झाले याविषयीची निश्चित भावना त्यातून व्यक्त होत नसून आश्चर्यच व्यक्त झाले आहे. ती ऋचा म्हणते, "जगनिर्मिती कशी झाली हे गूढच आहे. ती निर्मिती आपणहूनच झाली की नाही, हे तो आकाशातून पाहणारा सांगू शकेल. त्यालाही कदाचित ते माहीत नसेल."

विज्ञानाच्या इतिहासाचा मागोवा जर घेतला तर असे दिसेल की, आजवर झालेली विज्ञानाची प्रगती सर्व मानवजातीचा ठेवा आहे. वेगवेगळ्या संस्कृतींनी आजवर त्यात भर घातली आहे. विचारांचे व ज्ञानाचे अनेक प्रवाह या वैज्ञानिक वारशाला मिळाले आहेत. या वारशाचा जो युरोपकेंद्री इतिहास सांगितला गेला, त्या बायसविरुद्ध– गैरसमजाविरुद्ध– प्रतिक्रिया उमटणे अगदी स्वाभाविक आहे. सहज दिसणारे व नजरेस सहज येणारे उदाहरण घ्यायचे तर १४ व्या ते १६ व्या शतकांतल्या केरळमधल्या गणिती परंपरेचे व त्या परंपरेतला श्रेष्ठ गणिती संगमग्रामचा माधव याचे उदाहरण घेता येईल. या परंपरेने गणितात मोठी भर घातली आहे, हे आता मान्य झाले आहे. युरोपीय वैज्ञानिकांनी 'इन्फिनिट इन्वर्स ट्रिगॉनोमेट्रिक फंक्शन'चा शोध लावण्यापूर्वी दोनशे वर्षे आधी माधवाने हा शोध लावला होता. अलीकडेच माधव-ग्रेगरी, माधव-लायब्निझ, माधव-न्यूटन असा शब्दप्रयोग करण्यात येतो. आता असे म्हटले जाते की, माधवानेदेखील प्राचीन गणितातल्या फायनाइट प्रोसिजर्स- मर्यादित प्रक्रिया– समजून घेण्यासंबंधी पक्की पावले टाकली होती व मर्यादतेतून अमर्यादतेचा मार्ग मिळतो, असे मांडले होते. म्हणजे न्यूटन व लायब्निझ यांच्या दोनशे वर्षे आधी माधवाने कॅलक्यूलसचा हा क्रांतिकारक शोध लावला होता. विज्ञान व गणितात कॅलक्यूलसचे महत्त्व फार मोठे आहे हे लक्षात घेतले, तर माधवाच्या या शोधाचे महत्त्व लक्षात येते. हे महत्त्व का मानले गेले नाही, याची संभाव्य कारणे आपण पुढे पाहूच.

ब्रिटिश राजवटीनंतरच भारतात विज्ञानाचा शिक्षणसंस्थांत व प्रयोगशाळांत वापर सुरू झाला. म्हणून भारतीय विज्ञानपरंपरा पाश्चात्त्य विज्ञानेतिहासाने प्रभावित होणे स्वाभाविक आहे. आता मात्र भारताने फक्त पाश्चात्त्य विज्ञानपरंपरा उचलली असे म्हणता येणार नाही. रामन, चंद्रशेखर, बोस, सहा या सर्वांचे योगदान आधुनिक विज्ञानाचा भारतात पाया रचण्यात झाले आहे. रामानुजनसारख्या प्रतिभावंताचे साऱ्या जगभर कौतुक होते व आघाडीचे वैज्ञानिक शिलेदार रामानुजनने प्रभावित झाले आहेत. स्ट्रिंग थिअरी या माझ्या क्षेत्रात भारतीय वैज्ञानिकांनी अलीकडच्या काळात केलेले काम सर्वत्र मान्यता पावले आहे. हा वैज्ञानिक व बौद्धिक वारसा पाश्चिमात्त्य आहे, वसाहतवादी आहे असे म्हणून त्याच्याकडे दुर्लक्ष करणे योग्य होणार नाही. असे दुर्लक्ष अनैतिहासिक व संकुचित ठरेल. ते स्वदेशीविरुद्धही

आहे. विज्ञान पाश्चात्त्यानी निर्माण केले आहे, हेच चुकीचे आहे. विज्ञानाचे समाजशास्त्र व विज्ञानाचा इतिहास या गोष्टी विज्ञानाच्या आशयापासून व वास्तवापासून वेगळ्या आहेत, हे समजून घेतले पाहिजे. मुंबईत खाली टाकलेला दगड लंडनमध्ये खाली टाकलेल्या दगडासारखाच खाली पडणार. न्यूटन व आइनस्टाइनने गणितातील कॅलक्युलसचा वापर करून गुरुत्वाकर्षणाचे जे नियम मांडले, त्याचप्रमाणे गोष्टी घडणार. प्रथम माधवाने हे शोधले व नंतर लायब्निझ व न्यूटन यांनी ते नियम शोधले, याचा, दगड खाली पडण्याच्या वास्तवावर काही परिणाम होणार नाही. माधव हिंदू होता व न्यूटन प्रोटेस्टंट ख्रिश्चन होता, याचा परिणाम या वास्तवावर होणार नाही. थोड्याफार फरकाने वैद्यकीय उपचारांनाही हा नियम लागू होतो. आपल्या संदर्भात हे वैद्यकीय उपचाराचे उदाहरण अधिक महत्त्वाचे आहे. आपण स्थानिक परंपरा व आयुर्वेद यांना मान देऊ. विज्ञान एक सामाजिक रचना सोशल कंस्ट्रक्ट आहे असे म्हणू. पण गंभीर आजाराच्या बाबतीत पुराव्याने सिद्ध न झालेली वैद्यकीय उपाययोजना करणे योग्य होणार नाही. योग्य उपाययोजना न केल्यास पेशंटचा मृत्यूही होऊ शकतो. युरोपमध्ये १९ व्या शतकात होमिओपॅथी मान्यता पावली होती; पण आता होमिओपॅथीचे उपचार आधुनिक वैद्यक मान्य करीत नाही. युरोपमधल्या अंधश्रद्धेला अनुसरून स्वदेशीचे दीक्षित सांगतात की, सर्पदंशासारख्या घटनेच्या संदर्भात होमिओपॅथीचे औषध लागू पडते. ही अंधश्रद्धा आहे. होमिओपॅथीचे लाईक क्यूअर्स लाईक हे तत्त्व आयुर्वेदिकही नाही तसेच स्वदेशीही नाही.

आयुर्वेदिक उपचार जर अनुभवाच्या आधारावर पारखले गेले असतील व त्यांवर संशोधन झाले असेल, तरच आधुनिक औषधशास्त्रात त्यांना महत्त्वाचे स्थान मिळेल व या वास्तवावर स्वदेशी दृष्टिकोण स्वीकारणे शक्य होईल. युरोपकेंद्रित विचारांवर स्वदेशी चळवळ व उत्तरवसाहतवादी विचारवंत जी टीका करतात, त्यातील ऐतिहासिक दृष्टी योग्य आहे. वसाहती कालखंडात वसाहतींची जी लूट केली गेली व युरोपचे इतर भागांवर जे सांस्कृतिक वर्चस्व राहिले, त्या (दोनशे वर्षांच्या प्रदीर्घ) काळात इतिहासलेखन युरोपकेंद्रित झाले हे मान्य केले पाहिजे. १८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध हे शिपायांचे बंड नव्हते. (तसे काही इतिहासकारांनी म्हटले.) चर्चिल यांनी वसाहतींच्या बाबतीत जे शब्दप्रयोग केले ते लक्षात घेता भारतातील बुद्धिवंतांचा वर्ग त्यांची प्रशंसा करीत होता, एक प्रकारची पूजाच करीत होता व ज्या कृती त्याने केल्या ते पाहिले की, हे वास्तव विचित्र वाटते. युरोपला जगाचा केंद्रबिंदू मानून दुसऱ्या देशांना परिघाबाहेरचे मानायचे ह्या दृष्टीचा तो परिपाक होता.

(जगाचा व आपल्या देशाचा) बौद्धिक व सांस्कृतिक इतिहास लिहिताना आपले पूर्वग्रह–बायसेस–अगदी सूक्ष्म रीतीने प्रकट होतात. रोमिला थापर यांनी असे उदाहरण दिले आहे, “भारताच्या प्राचीन काळाचा विचार करताना युरोपीय इतिहासकार नेहमीच या काळाची तुलना युरोपच्या प्राचीन ग्रीक परंपरेशी करतात. ते करीत असताना त्यांच्या मनात पक्के असते की, प्राचीन ग्रीक संस्कृती ही त्या वेळच्या माणसाची सर्वश्रेष्ठ संस्कृती होती. जणूकाही ती एक चमत्कार होती, अशीही त्यांची धारणा असते. ते अभ्यासत असलेली प्रत्येक संस्कृती ग्रीकमधील त्या प्राचीन संस्कृतीशी ते ताडून पाहतात. ते अभ्यासत असलेल्या संस्कृतीत मग त्यांना न्यून आढळते. त्या संस्कृतीत जर त्यांना विशेष कौतुकास्पद गोष्ट आढळली, तर त्या गोष्टीची तुलना मग ते ग्रीक संस्कृतीशी करतात. प्राचीन भारताच्या इतिहासाचा अनेक दशके जाणकार म्हणून नावाजल्या गेलेल्या व्हिन्सेंट स्मिथ या इतिहासकाराची प्रवृत्ती अशाच प्रकारची होती. अजंठ्याच्या प्राचीन बुद्धिस्ट भित्तीचित्रांची तुलना तो प्राचीन ग्रीक भित्तीचित्रांशी करतो. वास्तविक ऐतिहासिक व कला दृष्ट्या त्या दोन्हींत काहीही साम्य नसतानाही तो म्हणतो की, ‘अजंठ्यातील भित्तिचित्रकला पर्शियामधून आली असावी, व ग्रीक संस्कृतीचा तिच्याशी काही संबंध असावा.’

युरोपीय नसलेल्या गोष्टींना युरोपीय संस्कृतीशी व प्राचीन ग्रीक संस्कृतीशी जोडण्याचे हे असे प्रयत्न निष्फळ असतात. आमच्या ग्रीक परंपरेपेक्षा वसाहतींची संस्कृती ही कमी दर्जाची होती, हे दाखविणारे असतात. युरोपीय संस्कृतीची माय असलेली ग्रीक संस्कृती ही एक चमत्कारच होती, ही धारणाही युरोपकेंद्री विचारातून येते व अशा

प्रकारचे लेखनही केले जाते. खरे पाहिले तर ग्रीक संस्कृतीचे मूळ आशिया आणि आफ्रिकेतच शोधावे लागेल. ते पश्चिम आणि उत्तर युरोपांत शोधताच येणार नाही. प्रत्येक महत्त्वाच्या गोष्टींची मुळे प्राचीन ग्रीक संस्कृतीत पाहणे व प्रत्येक महत्त्वाच्या गोष्टींची मुळे वैभवशाली वैदिक संस्कृतीत शोधणे या दोन प्रवृत्तींत कोणताही फरक नाही. वस्तुस्थितीचे विरूपन करून तिची मोडतोड करण्याचा हा प्रयत्न असतो. इतिहासाची नीट माहिती मिळण्यात तो अडथळा ठरतो. इतिहासाचे नीट पुनरावलोकन करणे हे उत्तरवसाहतवादी विद्वत्तेसमोरचे मोठे आव्हान आहे. बौद्धिक इतिहासाचे वस्तुनिष्ठ दर्शन घडविणे सोपे काम नाही. जबाबदारीने हे काम केले, तर स्वदेशी चळवळ मोठे ध्येय गाठील. युरोपकेंद्री विचारांच्या जागी भारतकेंद्री विचार आणण्याने काहीही साध्य होणार नाही. वास्तव काय होते आणि काय आहे हे नजरेआड केल्याने पर्यायी ज्ञानविचारव्यवस्था चुकीचा विचार किंवा चुकीचे ज्ञान प्रसारित करेल. असे होईल. असा दृष्टिकोण अंनिससारख्या लढाऊ चळवळींना मारकच ठरेल. अंधश्रद्धेच्या अंधारयुगात विज्ञानदृष्टीचा प्रकाश आणण्याचे ध्येय अंनिसने आपल्यासमोर ठेवले आहे.



# धर्म, विज्ञान आणि स्त्री

गीताली वि. मं.

धर्म म्हणजे religion असं म्हटलं तर लॅटिन भाषेत re - legio या अर्थानं माणसाचा निसर्गाशी इतरांशी – स्वतःशी तुटलेला संबंध पुन्हा जोडणारी शक्ती म्हणजे तुटलेपणावरचा उपाय अर्थात प्रेमळपणा-निर्हेतुक सहज स्नेह! दुसऱ्या शब्दांत पू. साने गुरुजी म्हणतात तसं खरा तो एकचि धर्म जगाला प्रेम अर्पावे।। पण प्रत्यक्षात भाव धर्माशी निगडित सर्व काही देवानं/प्रेषितानं/निर्माण केलं आहे ; त्यामुळे ते बदलण्याचा आपल्याला अधिकार नाही, अशी चुकीची धारणा विकृत संस्कारग्रस्ततेतून बळावलेली दिसते. खरंतर धर्म हे काही जीवाश्म झालेलं अपरिवर्तनशील वास्तव नाही. धर्मात सतत परिवर्तन होत आलं आहे. धर्म ज्या संस्कृतीचा घटक असतो, ती संस्कृतीच मुळात प्रवाही असते. काही सन्माननीय अपवाद वगळता हजारो वर्षं जगभरात पुरुषप्रधान संस्कृती आहे. पिढ्यान् पिढ्या कायदा आणि राज्यकर्ते यांच्यापेक्षाही ज्या हजारो विकेंद्रित व्यक्तींचा मिळून समाज होतो त्यांच्यामधील आंतरक्रियांद्वारे संस्कृती आणि अनुषंगानं धर्मही बदलत असतो. बदलाची गती धीमी असेल; पण निश्चितपणे निरंतनपणे बदल होत असतो. अनेकदा धार्मिक म्हणून आचरणात येणाऱ्या कल्पना मुळात निखळ सामाजिकच असतात. धर्मकल्पनांचा ऐतिहासिक कार्यकारणभाव समजला म्हणजे त्याच्याभोवतीचं संस्कारातून निर्माण केलेलं दिव्य वलय आपोआपच विलयाला जातं.

विज्ञानाच्या नव्या नव्या शोधांमुळे माणसांना अनेक कूट प्रश्नांची उत्तरं मिळाली, अनेक गूढांची उकल झाली. विश्वाची उत्क्रांती व विकासक्रम कोणत्या प्रेरणांमुळे, कोणत्या गतीनं आणि कोणत्या टप्प्यावर झाला हे माणसाला कळलं, तेव्हाच धर्म आणि राजकारणाचं अलगीकरण शक्यतेच्या कोटीत आलं. अर्थात ते अलगीकरण संपूर्ण आणि सर्वत्र सारख्याच प्रमाणात झालं नाही. राज्यसंस्था व धर्मसंस्था यांच्या युतीमुळे धार्मिक क्षेत्रातील जे अंतर्गत ताणतणाव आटोक्यात राहिले होते, ते ती युती भंग पावू लागताच उफाळून वर आले. विविध धर्मपंथ पुढे आले, त्यांची संख्या वाढली, धार्मिक क्षेत्रात मोठ्या प्रमाणावर फाटाफूट झाली. धर्म ही बऱ्याच प्रमाणावर माणसाची खाजगी बाब मानली जाऊ लागली. अनेक देशांत धर्मसंस्थांच्या हाती असलेली सामाजिक नियंत्रणाची सूत्रं त्यांच्या हातातून निसटली. विज्ञान आणि सामाजिक शास्त्रांचं प्रामाण्य स्वीकारून स्वर्ग-नरक, पाप-पुण्याच्या भाकड कल्पना मानवतावादानं झिडकारल्या. आता माणसं समान श्रद्धेपेक्षा सामाईक सामाजिक नैतिकतेतून परस्परांशी जोडली जातात आणि जोडलेली राहतात. बँकिंग, खरेदी-विक्रीसारखे आधुनिक व्यवहार देणी - घेणी करार-मदार यांच्या नियमावलीसाठी कोणीही आता धर्मसंस्थेकडे पाहत नाहीत. मानवतावादाचा विचार पुढे आल्याबरोबर धर्माची एकाधिकारशाही संपुष्टात आली. माणसाच्या जीवनाच्या ज्ञानात्मक, भावनात्मक आणि क्रियात्मक क्षेत्रातला धर्माचा पगडा ओसरत गेला. साक्षात्कारी ज्ञानापेक्षा अनुभवाधारित ज्ञान अधिक विश्वसनीय व ग्राह्य असतं, ही वृत्ती ज्ञानाच्या क्षेत्रात बळावली.

मार्क्सनं अशी मांडणी केली की, केवळ तर्कशुद्ध टीकेनं धर्माचा प्रतिवाद होऊच शकणार नाही. धर्माची तथ्ये ही भ्रांत तथ्येच आहेत, यात वाद नाही; पण ती माणसाला कोणत्या परिस्थितीत उपयुक्त वाटतात ते समजून घेऊन ती परिस्थिती पालटली, तरच भ्रांत तथ्यांचा म्हणजे धर्माचा निरास होईल. ज्या स्थितीत माणूस स्वतःच्याच शक्तीचा व गुणांचा काल्पनिक गोष्टींवर आरोप करून त्यांना अमानवी स्वरूप आणि स्वतंत्र अस्तित्व प्रदान करतो, ती परिस्थिती भ्रम नसते; तर ती मूर्त वस्तुनिष्ठ अशी सामाजिक स्थिती असते. सामाजिक संबंधांच्या त्या विशिष्ट स्थितीतच धर्मासारख्या आभासी तथ्यांचा उगम असल्यामुळे त्यांच्या निर्मूलनासाठी त्या

अनुक्रमणिका






सामाजिक कारणांचा शोध घेणं आणि त्यांचं निराकरण करणं हाच एक मार्ग असू शकतो. केवळ माणसांचं प्रबोधन करून किंवा त्यांना त्यांच्या सुप्त शक्तीची जाणीव करून देऊन ते शक्य होणार नाही. माणूस आभासी तथ्यांवर विश्वास ठेवतो याला केवळ त्याचं अज्ञान कारणीभूत नसतं; तर त्याला काही प्रश्नांची पर्यायी उत्तरं सापडत नाहीत. आणि दुसरं जास्त महत्त्वाचं कारण असतं ते म्हणजे समाजातील राज्यकर्ता वर्ग. जो त्याला धड विचार करू देत नाही ; कारण त्यात राज्यकर्त्यांचा स्वार्थ असतो. धर्मसंस्थेचा जन्मच मुळात धनिक सत्ताधारी वर्गाने निर्माण केलेल्या विचारसरणीतून झाला. विषम आणि शोषणयुक्त वर्गीय समाजरचना शोषित वर्गांनी बिनतक्रार स्वीकारावी आणि बंड न करता निमूट जगावं या हेतूनं समाजातील सुखदु:खाची व विषमतेची संपूर्ण जबाबदारी ही विचारसरणी ईश्वरावर सोपवते. धर्माची गरज शिल्लक राहू नये यासाठी प्रयत्न करण्याचं सोडून मानवी जीवनातून धर्माला हद्दपार करण्याचीच आंदोलनं केली गेली, तर ती कधीच यशस्वी होणार नाहीत असा इशारा काही समाजशास्त्रज्ञ देत आहेत.

धर्म व विज्ञान यांतील खरा संघर्ष हा शब्द व ग्रंथ-प्रामाण्य एका बाजूला आणि प्रत्यक्ष प्रयोग व निरीक्षणं दुसऱ्या बाजूला असा होता. धर्मशास्त्राला विज्ञानाशी तडजोड करावी लागली. धर्म आणि सामाजिक-आर्थिक व्यवहार यांच्यात समन्वय घडवून आणण्यासाठी धर्मशास्त्र निर्माण झालं. धर्माला एकीकडे व्यक्तीच्या मोक्षाची चिंता करायची असते, तशीच व्यक्ती ज्या समाजात वावरते त्या समाजाच्या ऐहिक भरभराटीची काळजीही वहायची असते. ही काळजी तो धर्मशास्त्राच्या माध्यमातून घेतो. धर्माचे क्षेत्र धर्मशास्त्रापेक्षा संकुचित असते. हिंदू धर्म व त्याच्यातील स्त्रियांचे स्थान नेहमीच धर्माच्या आत्मिक म्हणून समतानिष्ठ प्रेरणा आणि समाजातील आर्थिक-भौतिक विषम हितसंबंधांमधील संघर्ष यांच्यातील ताणतणावांमुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे आंदोलित होत राहिले आहे.

स्त्रियांवरील नियंत्रणाच्या मुद्द्यावर धर्मव्यवस्था व पितृसत्ता हातांत हात घालून परस्परपूरक पद्धतीने सामाजिक मान्यता-अमान्यतेचं राजकारण घडवत असतात. धर्मव्यवस्थेला 'बाधक' ठरू शकतील अशा विचारांना, व्यवहारांना पितृसत्ता थारा देत नाही आणि पितृसत्तेचे बुरुज ढासळवण्याची शक्यता असलेल्या विचारांना व व्यवहारांना धर्मव्यवस्था तग देत नाही, असं हे साटंलोटं असतं. धर्मव्यवस्थेनं मानवी लैंगिकतेला नीतिमत्तेच्या, पाप-पुण्याच्या, पवित्र-अपवित्रतेच्या चौकटी बहाल केल्या, तर पितृसत्तेनं पुरुषकेंद्री, भिन्नलिंगी, लग्नांतर्गत प्रजननावर भर असलेल्या एकनिष्ठतेच्या (विशेषकरून स्त्रीकडून) नियमांवर आधारित मानवी लैंगिकतेचा स्वीकार केला. यातून योनिशुचितेचं अवडंबर माजवून सती, विधवांचं केशवपन, विधवा पुनर्विवाह बंदी अशा फक्त स्त्रियांसाठीच्या घातक रूढी पुढे आल्या. मासिक पाळीच्या काळात स्त्रियांना अपवित्र मानून त्यांचा विटाळ होऊ नये म्हणून त्यांना धार्मिक कार्यातून दूर लोटलं गेलं. स्त्रियांची व्रतवैकल्ये, उपासतापास आणि इतर धार्मिक कर्मकांडांतूनही स्त्रियांचं दुय्यमत्व ठळकपणे दिसून येतं. स्त्रियांकडे बघण्याचा दृष्टिकोण परस्परविरोधी- देवी, कुलटा नाही तर दासी –यातून तिचं मनुष्यपण गोठवलं जातं. पुरुषप्रधान धार्मिक कर्मकांडात सवाष्ण स्त्रीला असणारी प्रतिष्ठा, विधवेला नकार, प्रौढ अविवाहिता, परित्यक्ता, घटस्फोटिता यांना मिळणारा दुजाभाव यांमुळे स्त्रियांमध्ये वर्गीकरण करून आपापसांत वैरभाव निर्माण करून दिला गेला. कौटुंबिक हिंसाचार, अवहेलना, छळ सहन करूनही स्त्रिया सवाष्ण/ सौभाग्यवती असण्याच्या प्रतिष्ठेमुळे विवाह मोडायला तयार होत नाहीत.

अपत्याची माता कोण हे सूर्यप्रकाशाइतकं स्पष्ट आहे; पण पितृत्वाविषयी अनिश्चितता ! त्यामुळे भयभीत झालेल्या पुरुषांनी पितृसत्ताक समाजात पितृत्वाला प्राधान्य तर दिलंच; वरती स्त्रीच्या शरीरावर आणि तिच्या जननक्षमतेवरही पतीलाच हक्क दिला. अपत्याला नावही पित्याचं देऊन मातेला नावामध्ये बेदखल केलं गेलं. पुरुषप्रधानतेचा पाया असणाऱ्या विवाहसंस्थेद्वारे स्त्रीवर अनेक बंधनं घालून पितृत्वनिश्चिती करण्याचा प्रयत्न पुरुष करतात. नियोगपद्धती, कुमारिका व विधवांना गर्भधारणेला विरोध करून स्त्रीला स्वतंत्र, स्वयंपूर्ण व

स्वावलंबी होण्यापासून रोखलं जातं. पितृप्रधान व्यवस्थेत विवाहांतर्गत मातृत्वालाच फक्त मान्यता आहे. या सर्वांभोवती एक धार्मिकतेचं वलय निर्माण करण्यात आलं आहे. ते विषमता जोपासणारं आहे.

धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ वैदिक धर्मात आहेत. 'पुरुष' शब्दाचा लिंगभावनिरपेक्ष व्यक्ती असा व्यापक अर्थ घेऊन त्यात स्त्रियांचा समावेश करण्याचा प्रयत्न काही वेळेला केला जातो. परंतु त्याला वास्तवात आधार नाही. स्त्रियांचं कार्यक्षेत्रच इतकं संकुचित केलं गेलं होतं की, त्यांना पुरुषार्थ करायला वावच नव्हता. या बाबतीत त्यांचे कर्तृत्व पुरुषांबरोबर दुय्यम भूमिकेतील सहभाग (नवऱ्याच्या हाताला हात लावून मम म्हणणे) एवढाच होता. वैदिक परंपरेत स्त्रीला मोक्ष नाही. परमेश्वराचा अवतार स्त्रीदेहात होत नाही. स्त्रीजन्मात योग्य ती धर्मसाधना केली तर मृत्यूनंतर तिला पुढचा पुरुषजन्म व नंतर मोक्ष.

सर्व भूतमात्रे ब्रह्मस्वरूप आहेत हा ब्रह्मवाद अनेकांना मान्य आहे. सर्व भूते एकाच ब्रह्मस्वरूपाची अभिव्यक्ती असल्यामुळे ती समान आहेत. हा झाला धर्माच्या आध्यात्मिक-तात्त्विक पातळीवरचा मुद्दा. पण इतर तीन क्षेत्रांत -आर्थिक, कायिक आणि वाचिक क्षेत्रांतही समता कुठे आहे. हा कळीचा मुद्दा आहे. म्हणून मग धर्माने पारमार्थिक सत्ता आणि व्यावहारिक सत्ता यांच्यात भेद मानला आणि व्यावहारिक क्षेत्रातली विषमता मान्य करून टाकली. कायिक म्हणजे स्त्रीदेह, पुरुषदेह यांच्या रचनात्मक भेदामुळे स्त्री पुरुषापेक्षा वेगळी, कमी बुद्धीची, कमी दर्जाची, कमी अधिकाराची असं मानलं गेलं. खोटारडेपणा, साहस आणि माया हे स्त्रीचे स्वाभाविक गुणधर्म आहेत, स्त्रीमध्ये पुरुषाच्या आठपट कामवासना असते, असे समज रूढ करण्यात धर्मग्रंथांनीही हातभार लावला आणि पुरुषाच्या उद्दिष्टांची पूर्ती करण्याचं स्त्रीला साधन ठरवलं. वाचिक क्षेत्र म्हणजे भाषाव्यवहार येथे धर्माने स्त्री-पुरुष विषमतेला प्रोत्साहन दिलं. हिंदू धर्माच्या वैदिक रूपांत स्त्रियांना संस्कृत या धर्मभाषेपासून व तिच्यात अभिव्यक्त झालेल्या वेदांपासून वंचित करण्यात आलं. स्त्रियांनी लिहिलेला एकही धर्मग्रंथ नाही. स्त्रीने स्थापलेल्या एकाही धर्माची वा धर्मपंथाची खबर नाही. एकही स्त्री आचार्यपीठावर बसली नाही. हे सर्व स्त्रीचे धर्मातले दुय्यम स्थान अधोरेखित करणारे आहे. आर्थिक क्षेत्राचं महत्त्व अनन्यसाधारण आहे. धर्मकृत्यं करण्यासाठी लागणारं धन, दानासाठी लागणारी संपत्ती स्त्रीकडे नाही. तिचे कार्यक्षेत्र अपत्यजन्म, संगोपन आणि इतर गृहकृत्ये ही उत्पादक मानली जात नाहीत; त्यांना मूल्य नाही. त्यामुळे स्त्रियांना पुरुषावलंबी करून त्यांचं दुय्यमत्व अबाधित राखण्यात पुरुषप्रधान व्यवस्था यशस्वी झाली. पुरुषप्रधान व्यवस्थेची मुळं इतिहास, अर्थकारण, राजकारण, समाजकारण, संस्कृतीकारण इ. इ. मध्ये इतकी खोलवरपणे रुजलेली आहेत की, पुरुषप्रधान व्यवस्था आणि विवाहसंस्था नैसर्गिकच व्यवस्था आहेत, असा सर्वसाधारण समज होताना दिसतो.

सर्व धर्मांतच स्त्रियांना दुय्यमत्व आहे आणि थोड्याफार फरकानं स्त्रिया हा अध्यात्ममार्गातला मोठा अडथळा मानला जातो. खरंतर बायकांशी संबंध टाळावाच या सावध पवित्र्यातच एकप्रकारे पुरुषांच्या मनाचा कमकुवतपणा सिद्ध होतो. बौद्ध परंपरेनुसार अनेक प्रयत्न करून स्त्री निर्वाण प्राप्त करू शकते; पण ती बुद्ध होऊ शकत नाही. तिला आधी खूप पुण्यकर्म करून पुरुषाचा जन्म घ्यावा लागतो. कारण बुद्ध होण्यासाठी मनुष्यत्व आणि पुरुषत्व या दोन महत्त्वाच्या अटी आहेत. जैन धर्माच्या परंपरेतला यापनीय पंथ व श्वेतांबर जैन स्त्रीला मोक्ष मिळू शकतो, असं मानतात; पण दिगंबर जैन ते नाकारतात. ख्रिश्चन धर्मात स्त्रियांना आत्मा असतो का, याविषयी चर्चा झाली. काहींचे म्हणणे होते, स्त्रिया म्हणजे नरकाचे दार! कारण त्या मोहाला बळी पडल्यामुळेच माणसाचे स्वर्गातून स्खलन झाले. स्त्रिया म्हणजे न्यूनत्व असलेले पुरुष असंही म्हटलं गेलं. ख्रिस्ती धर्मात सोवळं-ओवळं नाही. शारीरिक शुचितेपेक्षा मन पश्चात्तापाने दग्ध असेल तर ते अधिक महत्त्वाचे. स्त्री पाळीच्या दिवसात चर्चमध्ये जाऊ शकते. पवित्र प्रभुभोजन घेऊ शकते. परदेशात बिशप पदासाठी लढा देत आहेत. मुंबईसारख्या अत्याधुनिक महानगरात मात्र स्त्रियांना साधे धर्मगुरूपदही अधिकृत रीत्या मिळण्याची मारामार आहे. कॅथॉलिक पंथात नन होऊन पूर्णवेळ अथवा आयुष्यभर शिक्षण, आरोग्य, धर्म अशा सेवा-

अनुक्रमणिका

कार्यात घालवण्याचं स्वातंत्र्य तिला आहे.

पाश्चिमात्य विचारवंत व राज्यकर्त्यांनी इस्लाम हा स्त्री-विरोधी आणि स्त्री-हक्क आणि स्त्री-स्वातंत्र्य यांचा विरोधक आहे, असं गृहीत धरलं होतं. खरंतर कुराणानुसार विवाह हा स्त्री-पुरुषांमधला करार असून तो दोघांनाही बंधनकारक असतो. स्त्री पुरुषांच्या लैंगिक भावना आणि लैंगिकता हे इस्लाममध्ये पाप किंवा अपवित्र मानलं गेलेलं नाही. इस्लाममधील सर्व क्रांतिकारकता ख्रिस्ती इतिहासकारांनी आणि पोथीनिष्ठ मुस्लिम उलेमांनी संपवली आणि दाबून टाकली असा दावा प्रा. फक्रुद्दीन बेन्नूर करतात.

क्वेकर्स या पंथानं १९ व्या शतकात स्त्री-पुरुष समतेवर भर दिला होता. तसंच धर्म आणि समाजसुधारणेच्या विचारविश्वामध्ये म. फुले आणि गोपाळ ग. आगरकरांचं स्त्रीप्रश्नाचं चिंतन अतिशय प्रगल्भ होतं. दोघांचीही जीवनदृष्टी पूर्णतः इहवादी (secular) होती. फुल्यांनी निर्मिकवादाच्या अंगानं माणसाची पारलौकिकाशी असलेली नाळ जोडली तर आगरकर स्पेन्सरला अनुसरून उत्क्रांतिवाद, अज्ञेयवादाच्या अंगानं पारलौकिकाची नाळ तोडत पूर्णपणे इहनिष्ठ होतात. समाजाची जडणघडण माणूसच करतो आणि त्यामुळे त्यातील यशापयशास तसेच सिद्धी व प्रमादास सर्वस्वी तोच जबाबदार असतो, ही धारणा त्यांनी समाजात रुजवण्यासाठी अथक प्रयत्न केले. दोघांनीही जे बुद्धीला पटेल आणि समाजासाठी इष्ट असेल ते शास्त्राधाराची पर्वा न करता मांडलं पाहिजे, असं आग्रही प्रतिपादन केलं. स्त्री-पुरुष समतेचा आणि स्त्रीस्वातंत्र्याचा दोघांनी सतत उद्घोष केला.

दया, क्षमा, शांती, मानवी हक्क, समता, विश्वात्मकता ही मूल्यं धर्मानं मांडली; मात्र ती प्रत्यक्षात उतरवण्यात धर्म अयशस्वी ठरला; असं दुर्दैवानं म्हणावं लागतं. आधुनिकीकरण, धर्मनिरपेक्षीकरण, ज्ञान-विज्ञान-विस्तार इ. इ. मुळे समाजाचं धर्मावरचं अवलंबन काही अंशी कमी झालं असलं, तरी धर्मश्रद्धा संपल्या, व आटल्या असं म्हणता येत नाही. निधर्मी जगतातली अभावग्रस्तता आणि सामाजिक संबंधांची क्षणभंगुरता, आधुनिक जीवनशैलीतून येणारी स्पर्धात्मकता आणि एकाकीपणा, मूल्यसरणीची पुनर्रचना अशा विविध घटकांच्या सरमिसळीतून येणाऱ्या असुरक्षिततेपोटी भयाची भावना माणसाला आतून पोखरते आहे. या भयाचं आविष्करण सिद्धिविनायकापुढे लांब-लांब रांगा लावणं, महालक्ष्मी, मेरी, दर्गे इत्यादी ठिकाणी जाऊन नवस बोलणं, असंख्य बापू, महाराज, माँ आदींच्या भजनी लागणं इ. मधून होताना दिसतं. धार्मिक विधींचं अकारण स्तोम माजवून ते भव्य व खर्चिकपणे उत्सवी पद्धतीनं भपकेबाजपणे साजरे करणे इ. गोष्टींच्या आहारी जाणाऱ्या व अडाणी भोळ्या-भाबड्या आणि सुशिक्षित स्त्री-पुरुषांनाही टी. व्ही. वरील मालिका या बेगडी व भंपक धार्मिकतेला खतपाणी घालताना दिसतात. अशा धार्मिकतेला एवढं अभूतपूर्व उधाण का आलं आहे? मूलभूत सामाजिक व आर्थिक प्रश्नांची उत्तरं या कथित धार्मिक पुनरुज्जीवनातून मिळणार नाहीत हे समाजाला पटवून कसं द्यायचं, हा कळीचा प्रश्न आहे.

विज्ञान लिंगभावनिरपेक्ष असलं, तरी त्यात बहुसंख्य वैज्ञानिक पुरुष आहेत आणि त्यांचा स्त्रीकडे बघण्याचा दृष्टिकोण अतिशय पारंपरिक पद्धतीनं स्त्रीला दुय्यमत्व देणारा असा रक्तात भिनलेला आहे.

स्त्रियांजवळ असामान्य बुद्धिमत्ता असूनही गेल्या अनेक शतकांपासून त्यांना जगभरातच दुय्यम स्थान आहे. एकोणिसाव्या शतकापर्यंत अनेक स्त्रियांनी अतोनात कष्ट करून, हालअपेष्टा सोसून विज्ञानक्षेत्रात आपली बुद्धिमत्ता सिद्ध केली. संशोधनकार्याला वाहून घेतलेल्या, तंत्रविज्ञानामधील प्रगतीमध्ये सिंहाचा वाटा असणाऱ्या स्त्रियांची अनेक उदाहरणे आहेत. अनेक बायकांनी स्वतःचं आयुष्य नवऱ्याच्या संशोधनकार्यासाठी वेचलं; परंतु त्यांचं महान कार्य उपेक्षितच राहिलं. स्त्रिवादी चळवळ ते पुढे आणण्याचा प्रयत्न करते आहे. इतिहास म्हणजे His story आता Her story प्रकाशात आणण्याची नितान्त गरज आहे.

शास्त्रज्ञ स्त्रिया संख्येनं कमी असण्याचं मूलभूत कारण म्हणजे समाजात नांदत असलेली पुरुषप्रधान व्यवस्था. त्यामुळे स्त्रीला धर्मात दुय्यम स्थान असण्याचीच सर्व कारणं इथेही लागू पडतात व स्त्री-पुरुषांचा तुलनात्मक आत्मरचना, विशिष्ट हार्मोन्सचा प्रभाव अथवा अभाव






इ. इ. बाबतीत मोठ्या प्रमाणावर संशोधनं चालू आहेत. त्यातून परस्परविरोधी निष्कर्षही अनेकदा काढलेले दिसतात. कुठल्या बाबतीत, कुठे, किती प्रमाणात संशोधन होतं यातही पुरुषप्रधान व्यवस्था प्रतिबिंबित होताना दिसते. त्यातलं हितसंबंधांचं राजकारणही पुरुषी मानसिकता जोपासणारं असतं. त्यामुळे स्त्री-पुरुषांमध्ये वैज्ञानिक दृष्टिकोणाचे प्रमाण सम असतं की विषम, स्त्रीत्व आणि पुरुषत्वाचे नैसर्गिक गुणधर्म काय इ. इ. विषय पारंपरिक पुरुषप्रधान व्यवस्थेनुसार सतत बोलतेजागते ठेवले जातात. यातून स्त्री-पुरुषांचं एकसत्त्वीकरण केलं जाऊन पुरुषप्रधान व्यवस्था अबाधित राहायला मदत होते; म्हणून या प्रकारच्या संशोधनाचं महत्त्व मर्यादित स्वरूपाचं आहे. व्यक्तिपरत्वे असणारी सापेक्षता लक्षात घेऊन घाईघाईनं निष्कर्ष काढणं धोकादायक आहे, याचं भान ठेवायला हवं.

वैज्ञानिक दृष्टिकोण ही विचार व कृती करण्याची पद्धत आहे. तो सत्यशोधनाचा मार्ग आहे. ज्ञानाच्या क्षेत्रात सत्य काय, असत्य काय, याचा निर्णय वैज्ञानिक दृष्टिकोणाच्या आधारे विवेकबुद्धी करते. तसेच आचरणाच्या क्षेत्रात इष्ट-अनिष्टतेचा निर्णयही विवेकबुद्धी घेते. विवेकी आचरण आत्मकेंद्रित नसते. आपल्या विचाराबरोबर दुसऱ्यांच्या भावनांचा विचारही त्यात असतो. माणसाचं हित व प्रतिष्ठा आचरणाच्या केंद्रस्थानी येते. विवेकवाद हा धार्मिक श्रद्धेची जागा घेणारं ऐहिक तत्त्वज्ञान म्हणून पुढे आला आहे. विवेकवाद मानवाच्या सुखी जीवनाचं तत्त्वज्ञान असून हे सुख केवळ भौतिक नाही; तर भावनिक, बौद्धिक, सर्जनशील व नैतिक आहे. अखिल मानवजातीबरोबरच प्राणी व निसर्ग यांच्याशी सुसंवादी आहे. यामुळे आत्मकेंद्रिततेचं सामाजिक जाणिवांत रूपांतर होतं. तात्कालिक स्वसुखाच्या मर्यादा ओलांडून विश्वात्मक पातळीवर जाणं म्हणजे विवेकशील होणं. नैतिकता धर्मनिरपेक्ष असते. मनुष्यस्वभावांची उत्क्रांतीमध्ये विकसित झालेली, जीवनधारणेला उपयुक्त ठरणारी नैसर्गिक प्रवृत्ती असंही नैतिक भावनांकडे बघता येतं. नैसर्गिक प्रवृत्तीला वाव मिळाला की, माणसाला समाधान वाटतं. नीतीने वागणारे लोक परोपकारानं समाधानी व परपीडनानं दुःखी होतात.

विवेककारणाची सुरुवात समाजाचे प्रमाणमूल्य बदलण्यापासून होते. प्रमाणमूल्य म्हणजे समाजाचं वर्तन ज्या आधारे चूक की बरोबर असं ठरतं, ते मूल्य! परंपरेच्या प्रभावामुळे, अचिकित्सक वृत्तीमुळे, सामाजिक दबावामुळे, संस्कृतीकरणामुळे ही प्रमाणमूल्यं इष्टच आहेत, असा समज निर्माण करून दिला जातो. तो कसा चुकीचा आहे, प्रमाणमूल्यं कशा प्रकारे कुणाकुणाचं शोषण करतात, हे लक्षात आणून देऊन तो बदलण्यासाठी सत्तेशी संघर्ष करावा लागतो. संघर्षात विवेकवादाचा खरा कस लागतो. अजूनही पुरुषप्रधानता ही प्रमाणमूल्यं आहेत. त्याविरोधात अनेक पातळ्यांवर संघर्ष चालूच आहेत. त्याला बळकटी देण्याची गरज आहे. स्त्रीवादी धर्मशास्त्र हे मुक्तिवादी धर्मशास्त्र म्हणून पुढे आलं आहे. भांडवलशाहीचं विनाशकारी उत्पादनव्यवस्थेचं विषमतावादी स्वरूप याला विरोध करत अन्नसुरक्षा, निसर्गाचं संवर्धन, संपत्तीचं न्याय्य वाटप, दया, क्षमा, शांती आणि सामाजिक न्यायावर भर देणारं स्त्रीवादी धर्मशास्त्र विकसित करण्याचा प्रयत्न होत आहे. समाजातील उत्पादनवितरणाशी संबंधित असणारे भौतिक स्वरूपाचे अर्थव्यवहार एका बाजूला आणि समाजाला आत्मिक-नैतिक बळ देणारा धर्म दुसऱ्या बाजूला अशा या दोन शक्ती समाजाला तोलत सांभाळत असतात. या दोन्ही जेवढ्या परस्परपूरक, तेवढी समाजात स्थैर्य नांदण्याची शक्यता जास्त! स्त्रीवादी विचारधारा हे स्थैर्य नांदण्यासाठी कटिबद्ध आहे.

खरंतर तत्त्वज्ञ गोथे म्हणतात त्याप्रमाणे विज्ञान, धर्म, कला यांत आंतरसंबंध असतात. ते तिघेही सत्याचा शोध घेण्याच्या प्रयत्नात असतात. आपणच त्यांना एकमेकांचे विरोधक म्हणून उभे करतो. आज धर्माचा उपयोग व्यक्तीबरोबर समाजाचाही उत्कर्ष व्हावा याकरिता होण्याऐवजी वैयक्तिक स्वार्थासाठी केला जातो. जगातल्या सर्व धर्मांचे अनेक तुकडे झाले आणि प्रत्येक तुकड्याचे समर्थक आपलाच धर्म खरा असल्याचा दावा हिरीरिनं करत परस्परद्वेषभाव फैलावण्याचं विघातक काम समाजात करतात. आजच्या काळात धर्माच्या या तुकड्यांचा अभ्यास करून आपल्याला भावतील ती तत्त्वं अंगीकारून त्यांची एक सुरेखशी गोधडी करावी, ज्याला मानवतेच्या सूत्रानं

जोडलं गेलं असेल. असा मानवी मायेची ऊब असलेला ज्याचात्याचा 'स्वधर्म' व्यक्तीची चांगली वाढ करेल. लोकशाहीत स्वधर्म पाळणं शक्य आहे. आपला हा धर्म अनामिक असल्यानं त्याचं नाव घेऊन कुणीकुणाचा मान-अपमान करू शकणार नाही. आनंदात राहण्यासाठी उत्स्फूर्त व्यवहार करणं जितकं योग्य, तितकंच नियम नसलेले नियम असणंही आवश्यक! हे नियम नसलेले नियम शोधून काढणं, आत्मसात करणं म्हणजे स्वधर्माचा शोध. हे नियम व्यक्तीच्या आयुष्यात उमलत जातात. जे पाळताना आनंद तर होतोच, पण अधून-मधून मोडले तर अजिबात दुःख होत नाही. स्वधर्म पाळताना अंतरंग आणि बहिरंग यांचं अद्वैत लक्षात येऊ लागतं आणि आपपरभाव नाहीसा व्हायला मदत होते. दुसऱ्याच्या स्वधर्मातील एखादं चांगलं तत्त्व आपल्याला गवसतं आणि स्वधर्म सुधारतो. ती एक आयुष्यभराची आनंददायी प्रक्रिया असायला हवी.



# पाच (अधिक दोन) पातळ्यांची धर्म-संकल्पना

राजेंद्र प्रभुणे

**प्रस्तावना :**

(१)

धर्म हा माझा अभ्यासाचा विषय नाही. पण माणसाला अकस्मात, सकृद्दर्शनी विनाकारण, पाप-पुण्याच्या हिशोबापेक्षा कमी-जास्त सुख-दुःखे भोगताना पाहताना अनेक प्रश्न पडत गेले. त्यातून तणावरहित जगण्याचा आणि सुखाचा विचार करताना, याचसंबंधी धर्माला सांगायचे आहे का, असाही प्रश्न पडला. आणि धर्माच्या दडपणात आणि अनेक बुजबुजाटात उरलेसुरले, क्षणिक आणि क्षणभंगुर सुखही नष्ट का होते आहे, असाही प्रश्न पडला.

विज्ञानातही उपयोजित (वैद्यकीय) व त्या अनुषंगाने थोड्या भौतिक-रसायनशास्त्रांचा मी अभ्यास केला. केवळ आवड व कुतूहलामुळे मी नंतर मूलभूत आणि सैद्धान्तिक विज्ञानाच्या समुद्रात भीतभीत पावले ओली केली. त्यातून समुद्रात पावले ओली करण्यासाखीच आणि तितपतच मजा आली. पण उपयोजित विज्ञानातून जन्मलेल्या तंत्रविज्ञानाने जीवन सुखी होते आहे असे वाटू लागेपर्यंतच माणसाचे माणूसपणच नष्ट होते आहे का आणि मनुष्याजातच विनाशाच्या उंबरठ्यावर येऊन ठेपली आहे का, असेही प्रश्न पडू लागले.

मन मोकळे ठेवून बघता, अनुभवता आले पाहिजे आणि संपूर्ण मोकळेपणाने विचार करता आला पाहिजे, असे मला वाटत आले आहे. असा मोकळा पण तर्कशुद्ध विचार म्हणजे वैज्ञानिक विचार असे मला वाटते. असा विचार करणे फार अवघड आहे. पण धर्म आणि विज्ञानाकडे असे मोकळ्या मनाने आणि लांबून बघताना असाही प्रश्न पडला की, बऱ्याच बाबतींत दोन्हीही एकच गोष्ट पण वेगवेगळ्या भाषेत सांगत आहेत का?

उदाहरणार्थ : श्रीमद्भगवगीतेतील विश्वरूपाचे वर्णन व आधुनिक खगोलशास्त्रातील विश्वाचे वर्णन.

जे वाटले आणि मनात साचत गेले ते सांगणे हे संपूर्ण अडाणीपणाचे प्रदर्शन आहे. तरीही 'कोकीळ अद्वितीय स्वरात गातो तरी कावळा ओरडायचे थांबत नाही,' या न्यायाने हे सांगण्याचे धाडस करत आहे.

(२)

**धर्म म्हणजे काय?**

हिंदू तत्त्वज्ञाने व परंपरेप्रमाणे 'यद् धारयति स धर्मः' अशी धर्माची व्याख्या केली जाते. जो धारणा (स्थैर्य-संरक्षण-संवर्धन) करतो, तो धर्म. हे आपण गृहीत धरू.

धर्म म्हणजे काय, या प्रश्नाचेच उत्तर या व्याख्येत दिले आहे. पण ते नीट कळण्यासाठी धारणा म्हणजे काय व कशाची धारणा, हे समजले पाहिजे.

कशाची धारणा हे व्याख्येत स्पष्ट केले नाही, याचा अर्थ त्याचे उत्तर, 'सर्वसमावेशक', 'अस्तित्वात असलेल्या सर्व गोष्टींना लागू', असे असले पाहिजे.

साधारणपणे धर्माचा संबंध जीवनाशी (जीवन कसे जगावे/कसे जगू नये याच्याशी) जोडला असल्याने जीवनातील/जीवनाशी संबंधित सर्व गोष्टींची धारणा असा अर्थ आपण घेऊ शकतो. पण तो त्याच्याही पलीकडे 'सर्व अस्तित्वाची/अस्तित्वाशी संबंधित सर्व गोष्टींची धारणा' असा असावा, असा घ्यावा, असे मला वाटते. तसे केल्याने जीवनाशी संबंधित सर्व गोष्टींची धारणाही सर्वसमावेशक अस्तित्वधारणेत समाविष्ट होईल आणि बऱ्याच गोष्टी स्पष्ट व सोप्या होतील. विशेषतः धर्म म्हणजे काय ते समजून घेणे, तो का पाळायचा व कसा पाळायचा ते समजणे व धर्मपालन करणे (सर्वांनाच) सोपे होईल. तसेच धर्म व परस्परसंबंध; धर्म व विज्ञान, धर्म व कला, धर्म व स्वातंत्र्य, धर्म व समृद्धी, धर्म व सुख इत्यादी गोष्टी परस्परविरोधी/विरोधाभासी असण्याचे कारणच उरणार नाही.

**धारणा म्हणजे काय?**

धारणा म्हणजे मूलभूत गुण (गुणधर्म/स्वत्व). असा स्थिरावलेला गुण म्हणजे त्या वस्तूचा धर्म. गुणधर्म, स्वभावधर्म इ. शब्दही याच अर्थाने असणार. मग या

अनुक्रमणिका

गुणाचे स्थैर्य टिकवण्यासाठी व संरक्षण करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या सर्व गोष्टींचाही धारणेत (व म्हणून धर्मात) समावेश होतो. रूढ धर्मांच्या (Religions) बाबतीत विचार करताना सहसा धारणा म्हणजे स्थैर्य व संरक्षण एवढाच अर्थ गृहीत धरला जातो. यामुळे धर्म अपरिवर्तनीय, साचलेला व कालबाह्य होतो. कालांतराने त्याचे स्वरूप अपरिवर्तनीय (देवदत्त किंवा प्रेषितकथित) धर्मतत्त्वांचे कडवेपणाने व प्राणपणाने संरक्षण (बऱ्याच वेळा संरक्षणासाठी विरोधी/वेगळे विचार असलेल्यांना नष्ट करणे) असे बनत जाते.

धारणेच्या अर्थात स्थैर्य-संरक्षणाबरोबरच या मूलभूत गुणाच्या संवर्धनाचाही समावेश आहे (असे मला वाटते). त्यामुळे धारणा ही क्रियाशील प्रक्रिया (Dynamic process) बनते. संवर्धनात वाढ व विकासाचा समावेश होतो. म्हणजे धारणेचा अर्थ मूलभूत स्थिरावलेल्या गुणांचे (स्वत्वाचे) संरक्षण, वाढ व विकास. अशी ती सतत चालू रहाणारी क्रियाशील प्रक्रिया आहे. असे मानल्यास धर्म कधीच साचलेला व कालबाह्य असणार नाही व होणार नाही (पण मग धर्मतत्त्वेही अपरिवर्तनीय असणार नाहीत) आणि धर्म व विज्ञानातील एक भासमान भेद बाद होईल.

धर्म म्हणजे गुण-संवर्धन व संवर्धित गुणांची सुस्थापना, म्हणजे जास्त विकसित गुणांच्या सुस्थापनेची, पूर्णत्त्वाकडे जाण्याची, उत्क्रांतीची (क्रियाशील) प्रक्रिया, (Dynamic Process)असे मानता येईल.

अस्तित्वाच्या प्रत्येक क्षेत्रात, अस्तित्वात असलेल्या सर्व गोष्टींची याप्रमाणे धारणा करतो (व आपण सजाण व सुजाण असल्याने आपल्याला जाणीवपूर्वक करायला लावतो) तो धर्म. अस्तित्वातील प्रत्येक निर्जिव गोष्टीत हे धर्मपालन होतच असते; प्रत्येक सजीव गोष्ट हे धर्मपालन सहजतेने सहजप्रवृत्तीने व (अजाणतेपणाने) करतच असते आणि आपण (विश्वात कदाचित एकटेच) भान व जाण असलेले असल्याने आपण ते जाणीवपूर्वक करावे अशी अपेक्षा असते.

**(३)**

**धर्माचे ५ स्तर**

धर्माच्या वरील अर्थाप्रमाणे **धर्माचे ५ स्तर** आहेत असे मानता येईल. ते **एकावर एक** (कांद्याच्या पापुद्र्याप्रमाणे) असावेत (असायलाच पाहिजेत असे नाही). पण त्याचा संबंध स्तरांच्या उच्च-नीचतेशी किंवा श्रेष्ठतेशी नाही. हे सर्व स्तर श्रेष्ठतेच्या एकाच पातळीत व सारख्याच महत्त्वाचे आहेत. ते पुढीलप्रमाणे : (आकृती पुढील पाना वर आहे.)

**१. सहजधर्म - हा सर्व सजीवांशी संबंधित आहे. त्याला सजीवाचा मूलधर्म किंवा प्राणिधर्म म्हणता येईल.** जिवंत असणे हा सजीवाचा धर्म आहे व जीवाची धारणा करण्यासाठी, जिवंत रहाण्यासाठी, जे जे करावे लागेल (उदा., श्वास घेणे, पाणी पिणे, अन्न खाणे, पुनरुत्पादन करणे, इ.) ते करणे हाही त्याचा धर्म आहे. ती त्याची सहजप्रवृत्ती (Instinct)आहे व हा धर्म तो अंत:प्रेरणेने (Intuition) पाळतो. या धर्माला अनुसरून सजीवाने केलेले कृत्य कधीही अधार्मिक होऊ शकत नाही.[उदा., माकडाने (झाडाला न विचारता) फळ तोडणे, वाघाने खाण्यासाठी हरिणाला मारणे इ.]

**२. स्वधर्म - हा सजीवांच्या स्व-संकल्पनेशी संबंधित आहे. त्यामुळे तो स्व-सापेक्ष आहे.** तो स्व-भाव आहे. सजीवामध्ये स्व-संकल्पना किती प्रमाणात विकसित झाली आहे त्यानुसार शरीरधर्म, विचार-भावना-कल्पना, व्यक्तिमत्त्व अशा पातळ्यांवर हा धर्म व्यक्त होतो. उदा. सर्व अमीबा अमीबाप्रमाणे (अमीबाधर्माप्रमाणे) वागतात पण सर्व कुत्रे कुत्र्याप्रमाणे (कुत्राधर्माप्रमाणे) वागत असतानाच स्वतःच्या वेगवेगळ्या स्वभावांप्रमाणे (स्वधर्म) वागत असतात; काही कुत्रे प्रेमळ तर काही चिडके असतात; काही जास्त तर काही कमी भुंकणारे असतात; वगैरे. म्हणजेच अमीबापेक्षा कुत्र्यामधे व कुत्र्यापेक्षा माणसामधे स्वसंकल्पना जास्त विकसित असते व त्यानुसार त्यांचे स्वधर्म व्यक्त होतात असे आपण म्हणू शकतो. यामध्येच **भूमिका-धर्माचाही** अंतर्भाव होतो.

**भूमिका-धर्म :**

'मी' एकच असलो तरी निरनिराळ्या लोकांबरोबर (कौटुंबिक व सामाजिक नातेसंबंध) निरनिराळ्या वेळी निरनिराळ्या ठिकाणी, निरनिराळ्या प्रसंगांत (व्यवसाय, जीवनकार्य इत्यादिंमधे) 'माझी' भूमिका वेगवेगळी असते.











या भूमिकेत असताना आपण कसे असू, वागू ,इतरांशी संबंध ठेवू, यासंबंधी *स्व-कल्पना* इथे महत्त्वाची आहे.

उदा., मी व माझे वडील या संदर्भात 'मुलगा' या भूमिकेत मी कसा असेन (मुलगा-प्रतिमा) व कसा वागेन (मुलगा-धर्म) यासंबंधी ही *स्वतःची* कल्पना आहे व त्या 'भूमिकेनुसार' मी वागणे अभिप्रेत आहे. (मी मुलगा म्हणून कसा असायला व वागायला हवा यासंबंधी इतरांच्या–वडिलांसकट– काय कल्पना-अपेक्षा आहेत हे इथे महत्त्वाचे नाही. पण याला समाज-धर्मात महत्त्व आहे.) तसेच माझ्या मुलाबरोबर वडिलांसारखे वागणे हा माझा 'वडील-धर्म' आणि दोन्ही 'माझे' स्वधर्म आहेत. म्हणजे माझ्या 'वडिलांसारखे वागण्याबद्दलच्या' स्व-कल्पनांप्रमाणे मी वागतो आणि ते वागणे थोडे जगातल्या इतर सर्व वडिलांच्या वागण्यासारखे असते आणि थोडे वेगळे असते. कारण प्रत्येकाचा 'वडील-धर्म' त्याच्या त्याच्या स्व-संकल्पनेप्रमाणे थोडाथोडा वेगळा असतो.

**३. समाज-धर्म - हा समाज संकल्पनेशी संबंधित आहे. त्यामुळे तो समाज-सापेक्ष आहे.** त्यानुसार शरीरधर्म, विचार-भावना-कल्पना, व्यक्तिमत्त्व अशा व्यक्तिगत पातळ्यांवर व परस्परव्यवहार, परस्पर संबंध, अधिकाराची उतरंड, अशा सामाजिक पातळ्यांवर सामाजिक अपेक्षांनुसार हा धर्म व्यक्त होतो. त्यामुळे समाज किती प्रमाणात विकसित झाला आहे, यावर हा धर्म अवलंबून आहे. भूमिका-धर्माच्या स्थळकाळानुरूप सर्वमान्य सामाजिक कल्पनेप्रमाणे सर्वांनी त्या-त्या भूमिकेमधे असताना वागावे, अशी या समाज-धर्माची अपेक्षा असते. उदा.,- कुत्र्यांच्या कळपात प्रत्येक कुत्र्याने (त्याचा स्वभाव कसाही असला तरी) काय काम करावे, शिकारीत कोणती भूमिका घ्यावी व त्यानुसार शिकारीत त्याला किती वाटा मिळावा हे ठरलेले असते व त्यानुसार त्याने कुत्रा-समाज-धर्म पाळावा अशी अपेक्षा असते. तसेच मान्य व्यक्तीने वडीलभूमिकेत समाजमान्य वडील -धर्मानुसार वागावे, अशी समाजाची अपेक्षा असते. शिक्षकाने आणि डॉक्टरने (तरी) भेदभाव न करता अनुक्रमे ज्ञानदान आणि उपचार करावे, अशी समाजाची

अपेक्षा असते.

धर्म हा एका अर्थी स्व-समाज, समजगट - समाजगट, समाज-निसर्ग, निसर्गघटक-निसर्गघटक यांच्यातील आंतरक्रिया व परस्परसंबंध यांच्याशी संबंधित असल्याने याला **प्रणाली -धर्मही** म्हणता येईल. **म्हणजे प्रणाली-धर्माचा समाज-धर्म हा एक भाग आहे.**

**प्रणाली - धर्म (विचार - श्रद्धा- प्रणाली):**

इथे **'प्रणाली'** हा शब्द विस्तृत अर्थाने वापरला आहे. उदा., निसर्गचक्रे, पर्यावरण, प्राणी -आवास, मानव-निसर्ग, अनेकपेशीय प्राणी (आपण स्वतः), कुटुंब, जात, समाज, कंपनी, राष्ट्र, जागतिक समाज, बहुदेशीय कंपनी इ.

निरनिराळ्या प्रकारचे अनेक परस्परावलंबी घटक एकत्र येऊन काम करत असतील, तर ती प्रणाली बनते. एकत्र काम करताना घटकांत परस्परसंबंध निर्माण होतात. ते चांगले असतील तर कामही चांगले होते व सर्व घटकांची परस्पर सहकार्याने उन्नती होते. म्हणजे ती **विश्वास-श्रद्धा-प्रणाली** बनते. ही समान हेतू व ध्येय यांच्यावरील श्रद्धेभोवती निर्माण होणारी (श्रद्धेचा गाभा); परस्परविश्वासावर वाढणारी (विश्वासाचा परीघ) दीर्घकाळ टिकणारी व (स्वतःला नेमून दिलेले काम उत्स्फूर्तपणे व जबाबदारीले करणाऱ्या व एकमेकांशी सुसंवाद असणाऱ्या) सर्व एककांच्या सुसंबद्ध जाळ्याच्या साहाय्याने सुरळीतपणे काम करणारी प्रणाली असते. याचा अर्थ तिचा एक धर्म तयार होतो. **ती धर्माच्या पायावर उभी असलेली व वैज्ञानिक ज्ञानाच्या जोरावर भौतिक प्रगती साधलेली प्रणाली असते.**

थोडक्यात, प्रणाली-धर्म पाळणारी ती विश्वास - श्रद्धा- प्रणाली व इतर प्रणाली या साध्या प्रणाली असतात.

**विश्वास-श्रद्धा-प्रणालीची** उत्तम उदाहरणे– निसर्गचक्रे, अनेकपेशीय प्राणी - आपण स्वतः, शस्त्रक्रिया करणारा संघ, संगीताची मैफल इ.

हा प्रणालीधर्म **प्रणालीसापेक्ष** असतो. प्रत्येक प्रणालीसाठी तो वेगळा असू शकतो. या धर्मात प्रणालीची मूळ श्रद्धा, ध्येये-उद्दिष्टे, तत्त्वे-नीतिनियम, कार्यपद्धती, कार्यसंस्कृती इत्यादींचा समावेश होतो. प्रणालीतील घटक प्रणाली-धर्मनिष्ठेने पाळतात.

इथे एखाद्या घटकासंबंधी प्रणालीतील इतरांच्या काय कल्पना-अपेक्षा आहेत हे महत्त्वाचे आहे. म्हणजेच इथे भूमिका-धर्म गौण ठरतो. व्यक्तीसाठी भूमिका-धर्म महत्त्वाचा व प्रणालीसाठी प्रणाली-धर्म महत्त्वाचा. 'व्यक्ती' दोन्हींत समाईक व्यक्तीचा असते व भूमिका-धर्म व (प्रणालीचा घटक म्हणून) प्रणाली-धर्म फार वेगळे नसतील व त्यांत अंतर्विरोध नसेल, तर ती स्थिती व्यक्तीसाठी व पर्यायाने प्रणालीसाठीही सुखावह आणि कमी तणावयुक्त असते. उदा., 'मुलगा' म्हणून मी आईशी कसे वागायचे यासंबंधी माझ्या कल्पना व मी आईशी कसे वागावे यासंबंधी (आईसह) सर्व कुटुंबाच्या (कुटुंब-प्रणाली) अपेक्षा या एकमेकींशी जुळत्या असतील, तर हे नाते सुखावह व तणावरहित असते.

सर्व प्रणाली या विश्वास-श्रद्धा-प्रणाली नसतात;पण त्यांचे ते ध्येय असते/असायला हवे. विश्वास-श्रद्धा-प्रणाली बनणे ही सकारात्मक वाढ व विकासाची अखंड प्रक्रिया आहे (उदा., एखाद्या कंपनीचा 'ब्रँड' बनणे). या अर्थाने ती **व्यावहारिक व नैतिक उपलब्धी** (Achievement) आहे. त्या प्रणालीत प्रणाली-धर्म निर्माण झाल्याचे ते लक्षण आहे.

**४. नीतिधर्म – हा स्व-समाज व स्थळ-काळ-निरपेक्ष व निरपवाद असावा, अशी अपेक्षा आहे.** सत्य-असत्य, योग्य-अयोग्य, न्याय्य-अन्याय्य, तर-तम, आत्मसन्मान, अंतःप्रेरणा यांसारख्या गोष्टी व शाश्वत मूल्यांसंबंधी अपेक्षा या धर्मात व्यक्त होतात. म्हणून समाजातील मानव-मानव संबंध, मानव-इतर सजीव संबंध व मानव-निसर्ग संबंध स्वस्थ, तणावरहित व परस्परउन्नतीचे असण्यासाठी व टिकण्यासाठी हा आवश्यक आहे.

**५. अध्यात्म - हा संपूर्णपणे संकल्पनात्मक स्तर आहे. त्यामुळे तो सर्वनिरपेक्ष आहे.** परिपूर्ण, संपूर्ण सत्य, अत्युच्च, आदर्श, अंतिम अशा काही गोष्टी आहेत, असाव्यात, अशी अपेक्षा असते. अशा गोष्टींचा प्राप्तीचा प्रयत्न करणे हा अस्तित्वातील प्रत्येकाचा (निदान सजीवांचा, उच्च प्राण्यांचा, मानवाचा, किंवा काही मानवांचा तरी) धर्म आहे. अशा काही मोजक्या व्यक्ती या प्रयत्नात अंशतः जरी यशस्वी झाल्या, तरी त्यामुळे

संपूर्ण समाजाची, प्राणिमात्रांची, सजीवांची, संपूर्ण विश्वाचीच धारणा होईल, अशी ही संकल्पना आहे.

आपण जन्मापासून ज्या गोष्टी करतो, जशा करतो व जेव्हा करतो, त्याही याच अर्थाप्रमाणे, याच क्रमाने व ढोबळ मानाने याच स्तरांप्रमाणे करतो. म्हणजे अगदी लहानपणी आपण सहजधर्माप्रमाणे वर्तन करतो; बालवयात, आपल्याला 'स्व' ची जाणीव व्हायला सुरुवात झाल्यावर, आपण स्वधर्माप्रमाणे वागू लागतो; किशोरवयात व तारुण्यात आपल्याला समाजधर्माची जाणीव व्हायला लागते; किशोरवय संपून प्रौढ होता होता आपल्यात नीतिधर्माचा विकास होतो व पुढे प्रौढ वयात कधीतरी व वृद्धावस्थेत आपल्या मनात आध्यात्मिक विचार यायला सुरुवात होते. म्हणून या गोष्टी धर्माच्या स्तरांशी संबंधित असाव्यात. एका अर्थी याला तार्किक पाया आहे व त्याला उत्क्रांती, मेंदू-विकास, समाजशास्त्रे यांच्यात पुरावे आहेत.

(४)

हे स्तर मानल्यावर पहिला स्तर जर सहजधर्म (सजीवधर्म) म्हणजेच **सजीव वस्तुधर्म** असेल तर तार्किक दृष्ट्या **निर्जीव वस्तुधर्मही** (वस्तूचे भौतिक गुणधर्म) असणार. म्हणजे दोन्ही मिळून **वस्तुधर्म** झाला.

म्हणजे त्यांच्या मुळाशी **मूलधर्म (अस्तित्वधर्म)** असला पाहिजे. अस्तित्वधर्मात **अवकाश, काल, ऊर्जा व वस्तू** यांचा समावेश होतो.

या दृष्टीने अस्तित्वातील एखाद्या गोष्टीवर धर्माचे एकपासून पाचापर्यंत अनेक स्तर असू शकतात. उदा., दगडाला फक्त अस्तित्व धर्म व निर्जीव वस्तुधर्म आहे. त्याने विश्वातील भौतिक नियमांप्रमाणे वागावे (अस्तित्व-धर्मपालन करावे.) प्राण्याला अस्तित्वधर्म सहजधर्म (सजीव वस्तुधर्म) व स्वधर्म (गटाने राहणाऱ्या प्राण्यांना









समाजधर्म) आहे; सामान्य माणसाला अस्तित्वधर्म, सहजधर्म, स्वधर्म, समाजधर्म व नीतिधर्म आहे, इ. **याप्रमाणे धर्म सर्वसमावेशक मानल्यास धर्म कधीही अप्रस्तुत असणार नाही व होणार नाही.**

(५)

**नैसर्गिक धर्म :**

वरीलप्रमाणे खालचे (श्रेष्ठतेच्या अर्थाने नव्हे) दोन स्तर (वस्तुधर्म व स्वधर्म) + मूलस्तर हे निसर्गनिर्मित आहेत. **या स्तरांतील सर्व घटक आपापला *धर्म श्रद्धेने* पाळतात.**

तीच त्यांची नैसर्गिक वागण्याची पद्धत आहे. कोणीही कोणतेही धर्मबाह्य वर्तन करताना दिसत नाही. (उदा., प्रोटॉन इलेक्ट्रॉनभोवती फिरताना दिसत नाही, दगड स्वतःहून पळताना दिसत नाही, वाघ गवत खाताना दिसत नाही, माणूस चार पायांवर चालताना दिसत नाही इ.) म्हणून विश्व सुरळीतपणे चालते. (ते सुरळीत चालते याबद्दल कृतज्ञता व ते तसेच, त्याहीपेक्षा चांगले चालावे अशी इच्छा व आशा, हीच प्रार्थना.)

या स्तरांतील **धर्मांचा अभ्यास विज्ञान करते.**

सुरुवातीच्या धर्मांचे दोन उद्देश होते/असणार–

**१. भोवतालच्या नैसर्गिक परिस्थितीचे ज्ञान :** माणसाच्या स्वास्थ्यासाठी हे ज्ञान करून घेणे व जरूर भासल्यास (व शक्य असल्यास) स्वास्थ्यासाठी नैसर्गिक परिस्थिती बदलण्याचा प्रयत्न करणे. हा पहिला उद्देश होता हा उद्देश पूर्ण वैज्ञानिक आहे. म्हणजे सुरुवातीला विज्ञान हाच धर्म होता.

निसर्गज्ञानाच्या आकलनाच्या व प्रतिकूल परिस्थिती बदलणाच्या प्रयत्नांतून आटोक्याबाहेरच्या नैसर्गिक गोष्टींना देवत्व देण्याची व त्याहीपलीकडील गोष्टींसाठी काल्पनिक शक्तींची-संकल्पनांची निर्मिती करून त्यांना देवत्व देण्याची पद्धत सुरू झाली असावी. मग या देवांना अनुकूल करण्यासाठी प्रार्थना व कर्मकांडे सुरू झाली.

**२. माणसामाणसांतील व्यवहाराचे नीतिशास्त्र-** दोनपेक्षा जास्त माणसे एकत्र आल्यावर व माणूस हा गटाने राहणारा प्राणी आहे हे मान्य केल्यावर एकमेकांतील व्यवहाराचे नियम ठरवणे आवश्यक झाले. **(पहा- मनुष्यनिर्मित धर्म)** यानंतर हळूहळू जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत धर्माचा प्रवेश (प्रवेश, मत, लुडबुड, ढवळाढवळ व सत्ता) झाला. (जसा आता राजकारणाचा प्रवेश झाला आहे.). हे सध्या अस्तित्वात असलेले रूढ धर्म (ज्यांना रूढार्थाने धर्म म्हटले जाते).

**मानवनिर्मित धर्म :**

यानंतरचे ३ स्तर मनुष्यनिर्मित आहेत. ते बुद्धी व विवेकाच्या उपयोगातून स्वतः व समाजाच्या वाढ, विकास व उन्नतीसाठी निर्माण केलेले आहेत.

यांतील समाजधर्म व नीतिधर्म या २ स्तरांचा अभ्यास **समाजशास्त्रे** करतात व शेवटच्या २ स्तरांचा (नीतिधर्म सामायिक) अभ्यास **तत्त्वज्ञाने** करतात.

प्रत्येक माणसाच्या बुद्धिमत्तेची क्षेत्रे व स्तर वेगवेगळे असतात. प्रत्येकाच्या विवेकाचा स्तरही वेगवेगळा असतो. त्यामुळे प्रत्येकाने हा अभ्यास करावा (त्यावर विचार करावा व त्यानुसारच वागावे), हे शक्यही नसते व अपेक्षितही नसते. (त्या त्या क्षेत्रांतील) काही असामान्य बुद्धिमत्तेची माणसे हा अभ्यास व विचार करतात. सामान्य माणसे त्या अभ्यासाच्या उपयोगाने सुखाने जगण्याचा प्रयत्न करतात. हेच शब्दप्रामाण्य. (हे धर्मांच्या बाबतीत जितके खरे आहे, तितकेच विज्ञानाच्या बाबतीतही आहे. सर्वच माणसे वैज्ञानिक नसतात. फक्त विज्ञानात 'शब्द' तपासून बघण्याची सैद्धान्तिक संधी व शक्यता गृहीत धरली आहे, तशी ती धर्मात नाही, असे समजले जाते व असा समज बुद्ध्या पसरवला जातो.)

म्हणून विवेकाची, ज्ञान अद्ययावत राहील याची, सर्वांच्या भल्याची व शोषण/अन्याय होणार नाही याची **जबाबदारी असामान्य ज्ञानी माणसांवर** (धर्मवेत्ते, तत्त्वज्ञ, संत, समाजशास्त्रज्ञ, वैज्ञानिक, कलावंत, इत्यादींवर) आहे.

असामान्य बुद्धिमत्ता व नैतिकता असलेल्या अती-जबाबदार माणसांनी याप्रमाणे **धर्म ठरवल्यावर** व तो नवीन ज्ञान-विज्ञानाच्या, गरजांच्या व परिस्थितींच्या कसोटीवर अद्ययावत राखल्यावर **असा धर्म (प्रणाली, धर्म)** सर्व (सामान्य व असामान्य) घटकांनी **श्रद्धेने पाळल्यास** जग सुरळीतपणे चालेल.

हीच आशा व अपेक्षा 'सर्वेपि सुखिनः सन्तु ......' या प्रार्थनेत व्यक्त होते

(६)

**काल्पनिक स्तर :**

वरील मानवनिर्मित तिसऱ्या, चौथ्या व पाचव्या स्तरांतील काही भागांचे मिळून **रूढ धर्म (धर्मपंथ)** बनतात; पण याशिवाय धर्मात अनेक काल्पनिक व संकल्पनात्मक गोष्टी आढळतात. त्यांचा **काल्पनिक स्तर** मानता येईल. त्यातील मोठा भाग जसा धर्माने व्यापला आहे, तसाच मोठा भाग विज्ञानानेही व्यापला आहे. पण जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत अनेक *काल्पनिक व संकल्पनात्मक* गोष्टी असतात. त्यांचा सर्वांचा मिळून काल्पनिक स्तर बनतो. म्हणून हा काल्पनिक स्तर फार मोठा (व महत्त्वाचाही ) आहे.

कल्पनेचा तार्किक विस्तार केल्यास त्याला **तार्किक काल्पनिक स्तर** म्हणता येईल. त्यात गणित, विज्ञान, तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान इत्यादींचा प्रामुख्याने समावेश होतो. पण साधारणपणे माणसाच्याकल्पनांत व विचारांत तार्किक क्षेत्राच्या तुलनेत अतार्किक क्षेत्राचे प्रमाण व व्याप्ती खूप मोठी असते. त्याला **अतार्किक काल्पनिक स्तर** म्हणता येईल. त्यात धर्म व कला इत्यादींचा प्रामुख्याने समावेश होतो.

उदा., धार्मिक भाग – आत्मा, ईश्वर-परमात्मा, मोक्ष, विश्वनिर्मिती स्वर्ग, नरक, पुनर्जन्म इत्यादींसंबंधी कल्पना व वैज्ञानिक भाग– विश्वनिर्मिती, विश्वरचना, प्रकाशाचे (विद्युत्‌चुंबकीय तरंग) स्वरूप, अवकाश, काळ, ऊर्जा इत्यादींसंबंधी कल्पना, सिद्धान्त/उपपत्ती, तार्किक प्रयोग, तार्किक भाकित, तार्किक सिद्धता इत्यादी.











राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सर्व धर्म कालबाह्य आणि निरुपयोगी आहेत

शरद अभ्यंकर

बर्ट्रांड रसेल म्हणतात, 'माणूस हा तर्कशुद्ध विचार करणारा प्राणी आहे, असे म्हटले जाते.' पण त्यांच्या ५० वर्षांच्या जाणत्या आयुष्यात आणि मानवी इतिहासाच्या अवलोकनात, त्यांना या गोष्टीचा क्वचितच पुरावा मिळाला. विरुद्ध पुरावे मात्र अगणित होते.

भारतासारख्या अज्ञान, अंधश्रद्धा आणि दारिद्र्य यांनी गांजलेल्या देशात तर हे प्रकर्षाने जाणवते. धर्माचेच उदाहरण घ्या ना! देव, श्रद्धा, अमर आत्मा, पुनर्जन्म, स्वर्ग, नरक, सैतान, न्यायदानाचा दिवस, कयामत, मोक्ष, चित्रगुप्त, मोत्यांचे दरवाजे यातली एक तरी गोष्ट तर्कसंगत विचाराच्या कसोटीवर टिकेल काय? पण धर्म म्हटले की तर्कशुद्ध विचार, शास्त्रीय पद्धती, प्रयोगाने सिद्धता या सगळ्याला सोडचिठ्ठी द्यायची असते; उलट, अंतर्ज्ञान, साक्षात्कार, ऋषिवचन, श्रुती, स्मृती, पुराणे, बायबल, कुराण, गीता आणि 'एन' धर्मग्रंथ यांवर आंधळा विश्वास ठेवायचा असतो. याही पुढे जाऊन यःकश्चित भौतिकी आणि रसायनशास्त्र अशा फालतू विषयांचे नियम आमच्या या महान धर्म आणि अध्यात्मशास्त्राला लावताच येणार नाहीत, 'तो विषय फार गहन आहे', असे सुनवायचे असते.

आता थोडा वेळ तुमचे पूर्वग्रह बाजूला ठेवून पुढील मुद्द्यांचा तर्कसंगत विचार करा. मला खात्री आहे, तुम्हाला माझे म्हणणे पटेल.

१. सर्व धर्म जुनाट आणि कालबाह्य झाले आहेत. ते स्थापन झाले त्या वेळी त्यांचा समाजाला काही उपयोग असला पाहिजे. पण त्या वेळी साऱ्या निसर्गाच्या आणि सृष्टिनियमांच्या अगदी प्राथमिक ज्ञानावर त्यांची उभारणी झाली असल्यामुळे देव, देवता, राक्षस, भुते, मृतात्मे, काळी जादू, चेटूक अशा गोष्टींनीच धर्म भरलेला असे. अजूनही या कल्पनांचा प्रभाव नाहीसा झालेला नाही. हिचकॉकच्या 'सायको' या चित्रपटाचा नायक त्याच्या मृत आईचे प्रेत ती जिवंत आहे असे समजून सांभाळत असतो. तसेच आपण आज केव्हाच मृतप्राय झालेल्या धर्मांची कलेवरे कवटाळून बसत आहोत.

२. आपल्या अनुयायांनी विश्वाची निर्मिती, सांभाळ आणि नाश करणाऱ्या ईश्वरावर विश्वास ठेवला पाहिजे, अशी सर्व धर्मांची मागणी असते. काही धर्म निरीश्वरवादी आहेत; पण त्यांच्या अनेक अनुयायांनाही ही गोष्ट माहीत नसते. या धर्मीयांचीही महाकाय मंदिरे असतात, तिथे देवाच्या ऐवजी धर्मसंस्थापकांच्या मूर्ती असतात. बाकी सर्व कर्मकांडे जवळपास तशीच असतात. ईश्वर मानणारे धर्म मात्र या ईश्वराच्या अस्तित्वाचा शास्त्रीय पुरावा कधीच देत नाहीत.

३. हा ईश्वर सर्वसमर्थ, सर्वसाक्षी आणि सर्वत्र असतो. झाडाचे पानसुद्धा त्याच्या अनुमतीवाचून हलत नाही आणि मुंगीच्या पायातल्या घुंगराचा आवाजही तो ऐकू शकतो, असे धर्मग्रंथ सांगतात. याचा अर्थ असा, की तो सर्व उकिरडे, वेश्यालये, महारोगी वसाहती इथेही असतो आणि सर्व खून, लुटालूट, जाळपोळ, बलात्कार, बालकांवरील लैंगिक अत्याचार, मानवी हत्या, या सर्व गोष्टी त्याच्या अनुमतीनेच होत असतात. सर्व भूकंप, सुनामी, वणवे, वादळे, रोगराई आणि दुष्काळ यांचा तोच निर्माता असतो. या आपत्तीमुळे याच ईश्वराने निर्माण केलेली हजारो माणसे, बायका-मुले, प्राणी, वनस्पती, पक्षी, कीटक हे अकाली मरण पावतात, हेही त्याचीच इच्छा म्हणून? धन्य आहे असल्या तर्कशून्य गोष्टींवर विश्वास ठेवणाऱ्यांची!

४. यावरून एक गोष्ट सिद्ध होते ती म्हणजे या सर्व आपत्ती आणि दुःखे दूर करण्याची ईश्वराची इच्छा असते पण शक्ती नसते अथवा शक्ती असते पण इच्छा नसते. या शृंगापत्तीतून मार्ग काढण्याकरता श्रद्धाळू लोक पूर्वजन्मीची पापे, ग्रहदशा, सैतानाची कामगिरी, नशीब, नियती, कलियुग, संचित असली कधीही सिद्ध न झालेली कारणे (खरे म्हणजे सबबी) सांगतात.

५. प्रत्येक धर्म सांगतो की परमेश्वर न्यायी आणि दयाळू असतो. आता हे कसे शक्य आहे? त्याने पापी माणसाला शिक्षा केली तर तो दयाळू नाही आणि त्याला क्षमा केली, तर तो न्यायी होऊ शकत नाही.

६. प्रत्येक धर्म हा व्यक्तिशः ईश्वरानेच किंवा त्याच्या प्रतिनिधीने स्थापन केलेला आहे, अशी त्या धर्माच्या अनुयायांची खात्री असते. अशी खात्री असल्याशिवाय ते त्या धर्माचे अनुयायी होऊच शकत नाहीत आता अशी कल्पना करा की, तुम्ही स्वतः साक्षात ईश्वर आहात. तर तुम्ही जगात परस्परविरोधी तत्त्वज्ञान सांगणारे एक डझनभर मोठे आणि असंख्य छोटे धर्म निर्माण केले असते का? इस्रेली विरुद्ध इजिप्शियन, ख्रिश्चन विरुद्ध ज्यू, ज्यू विरुद्ध मुस्लीम, मुस्लीम विरुद्ध हिंदू, हिंदू विरुद्ध बौद्ध, असे रक्तपात शेकडो वर्षे चालू दिले असते का? आणि धर्म विरुद्ध त्याच धर्माचा उपपंथ, जसे कॅथोलिक विरुद्ध प्रोटेस्टंट, शिया विरुद्ध सुन्नी, शैव विरुद्ध वैष्णव, हीनयान विरुद्ध महायान, श्वेतांबर विरुद्ध दिगंबर, सवर्ण विरुद्ध दलित असे निरर्थक पण जीवघेणे वाद निर्माण केले असते का? लक्षावधी लोकांना ते केवळ अन्य धर्माचे आहेत म्हणून ठार केले जात असताना तुम्ही ते थांबवले नसते का? असे करू न शकणारा ईश्वर हा नक्कीच निर्दय आणि अन्यायी असला पाहिजे. पण हे तर ईश्वराच्या प्राथमिक गुणधर्माच्या विरोधी ठरते. निष्कर्ष–ईश्वर नसतोच. आणि धर्म म्हणजे 'ईश्वराप्रत नेणारा मार्ग' असे सर्व धर्म ओरडून सांगतात. हे मार्ग म्हणजे मुदत संपलेल्या औषधासारखे असतात. काही थोड्या उपयोगाचे, काही निरुपयोगी तर काही उघड उघड धोकादायक!

(अनेकजण ईश्वरनिष्ठांच्या हिंसक कारवायांना अमानुष किंवा पाशवी म्हणतात. मला हे मान्य नाही. माणसाव्यतिरिक्त कोणीही पशू अन्य पशू केवळ दुसऱ्या धर्माचा आहे म्हणून त्याला ठार मारत नाही. धार्मिक संहाराला पाशवी म्हणणे हा पशूंचा अपमान आहे.)

इथे मी आस्तिक मंडळी नेहमी एक प्रश्न उपस्थित करतात त्याचे उत्तर देऊ इच्छितो.

तो प्रश्न असा : धर्म आणि देव यांनी जर हजारो वर्षे जगात इतका उत्पात आणि रक्तपात माजवला असेल, तर लक्षावधी लोक अजूनही या दोन गोष्टींना आनंदाने संमती देऊन त्यांत रममाण होतात हे कसे? धर्म सदैव वाईटच होता का?'

मी आधीच मान्य केले आहे की, प्रत्येक धर्मामध्ये सुरुवातीच्या काळात काही समाजोपयोगी तत्त्वे होती. तशी नसती तर कोणी त्याचे अनुयायीच झाले नसते. हेही खरे आहे, की बऱ्याच वेळा लोकांना धर्माचा स्वीकार सक्तीने, आमिष दाखवून किंवा लबाडीने करायला लावण्यात आला. पण ही संख्या सर्व जगाच्या लोकसंख्येच्या मानाने अल्प होती. मग धर्माने लोकांसाठी सकारात्मक योगदान काय दिले?

१. नीतीने वागा हे प्रत्येक धर्माचे सांगणे होते. षड्रिपूंचा सर्व धर्मांनी निषेध केला आहे.

२. प्रत्येक धर्मात अनेक संत होऊन गेले. त्यांनी साधे, प्रामाणिक आणि भक्तियुक्त जीवन जगण्याचा संदेश स्वतःच्या आचरणातून दिला.

३. या संतांनी भक्ती आणि तत्त्वज्ञान यांवर उत्कृष्ट काव्यरचना व ग्रंथरचना केली.

४. धर्मकेंद्रांच्या ठिकाणी मूर्तिकला, शिल्पकला, वास्तुकला, चित्रकला, गायन, वादन, नृत्य अशा कलांना उत्तेजन मिळाले.

५. धर्मकेंद्रे ही ज्ञानसाधनेची ठिकाणे, दानधर्माची केंद्रे आणि संकटसमयी आधारगृहे होती.

६. धर्मप्रसार करणाऱ्या मिशनरी लोकांनी शिक्षण व आरोग्य या क्षेत्रांत उत्तम कामगिरी बजावली. याउलट, बहुतेक सर्व धर्मांनी जी भयंकर पापे केली, त्यांचे वर्णन करण्याकरता अनेक ग्रंथ अपुरे पडतील. थोडे नमुने पाहू या.

१. ज्यू राजे नवख्रिस्ती अनुयायांना भुकेल्या सिंहापुढे फेकत असत.

२. पुढे शेकडो वर्षे ख्रिश्चन धर्मीयांनी ज्यूंचा भयंकर छळ केला.

३. ज्यू अद्यापही निष्पाप पॅलेस्टिनींना गाझा पट्टीत यमसदनाला पाठवीत आहेत.

४. ख्रिस्ती धर्मपंडित हजारो निरपराध स्त्रियांना चेटकिणी ठरवून जिवंत जाळत असत.

५. शेकडो हिंदू विधवा स्त्रियांना पतिनिधनानंतर चितेवर

जाळून घेण्याची जबरदस्ती केली जाई. सती गेल्यास तत्काळ स्वर्गप्राप्ती अन्यथा कायम नरकवास अशी खोटी भीती घातली जाई.

६. ख्रिस्ती धर्मप्रसारक अजूनही असे सांगतात की, केवळ ख्रिस्ताला मानणाऱ्यांनाच स्वर्ग मिळेल, इतरांना अनंतकाळ नरकवास.

७. 'वसुधैव कुटुंबकम्' असा विशालहृदयी संदेश देणाऱ्या हिंदू धर्मात अस्पृश्यता आणि मन्दिरप्रवेश बंदी असे अन्यायी प्रकार हजारो वर्षे पाळले जात. अजूनही कुठे कुठे सापडतात.

८. धर्माने मान्यता दिलेले हजारो बालविवाह भारतात अद्याप पार पाडले जातात.

९. हिंदू धर्मात विधवाविवाह निषिद्ध असल्यामुळे असंख्य विधवांना अपमानास्पद आणि हलाखीचे जीवन जगावे लागत होते. अजूनही लागते.

१०. देवाला प्रसन्न करण्याकरता आजही नवस किंवा कुर्बानी म्हणून हजारो प्राणी मारले जातात.

११. काहीशे वर्षांपूर्वी चर्चमधील प्रार्थनागटात गाण्यास स्त्रियांना बंदी असे. त्यामुळे मुलांचा कोवळा आवाज टिकावा यासाठी त्यांचे अंड निर्हरण (Castration) केले जात असे.

१२. मुस्लीम आक्रमक वा राज्यकर्ते हजारो अन्य धर्मीयांना 'काफर' ठरवून ठार करत असत. अतिरेकी मुस्लीम हल्लेखोर अजूनही तेच करतात.

१३. शेकडो वर्षे चालणाऱ्या 'धर्मयुद्धा'मध्ये युरोप-आशियाचा प्रचंड भूभाग उद्ध्वस्त झाला, हजारो नागरिक ठार झाले. लढणारे ख्रिश्चन आणि मुस्लीम तर सोडाच, हजारो ज्यूही विनाकारण मारले गेले.

१४. काफर माणसाला जबरीने इस्लाम स्वीकारायला लावणे कुराणाला मान्य आहे.

१५. धर्माकरता मृत्यू पतकरणे हा सर्वोच्च सद्गुण मानला जातो. त्यामुळे आत्मघातकी दहशतवाद्यांना उत्तेजन मिळते.

१६. शेकडो हिंदू मुली यल्लम्मादेवीला अर्पण करून वेश्या बनवल्या जातात.

१७. सर्व सामाजिक सुधारणांना धर्माधिकाऱ्यांनी कडाडून विरोध केला आहे. (स्त्रियांना मतदानाचा हक्क, वारसा, घटस्फोट, - यादी अनंत आहे.)

१८. अनेक शास्त्रीय शोधांना आणि संशोधकांना धर्माने विरोध केला आहे. (ब्रुनोला जिवंत जाळण्यात आले. गॅलीलिओला कारावास भोगावा लागला.)

१९. आजही, डार्विनच्या उत्क्रांती सिद्धान्ताला ठाम विरोध करणारे 'बुद्धिमान रचनावादी' (म्हणजेच 'ईश्वरवादी') अमेरिकेतही आहेत.

२०. धार्मिक सेवेकऱ्यांनी चालवलेल्या रुग्णालयांत वाचलेल्या जीवांची संख्या धार्मिक अत्याचारापायी मरण पावलेल्या संख्येच्या मानाने नगण्य आहे.

मला वाटते, एवढी यादी तुमचे समाधान होण्यासाठी किंवा तुम्हाला किळस येण्यासाठी पुरेशी आहे. तरी तुम्ही मला विचाराल, धर्म जर इतका वाईट आणि विध्वंसक आहे, तर माझ्यासारखे काही चक्रम लोक सोडले तर जगातले सर्व लोक या ना त्या धर्मावर विश्वास ठेवून त्यानुसार आचारविचार का करतात?

उत्तर सोपे आहे; पण अविश्वसनीय आहे.

ते असे आहे की, परमेश्वर आणि त्याच्या सन्निध जाण्यासाठी काही नियमबद्ध जीवन यामुळे माणसाचा ताकदवान 'अहंभाव' (इगो) कुरवाळला जातो. आपले सर्व आयुष्य कोणीसर्व सामर्थ्यवान शक्ती सांभाळत आहे, मीच नव्हे तर सारे विश्व या महान शक्तीने निर्माण केले आहे, ही शक्ती मी काही अपराध केले तरी मला दया दाखवणार आहे, मी सत्कृत्ये केली तर मला स्वर्गसुख बहाल करणार आहे, ही कल्पनाच किती रम्य आहे ना? मी, – या पृथ्वीतलावरील सर्वांत बुद्धिमान आणि प्रगत जीव – हा केवळ एका जीवशास्त्रीय अपघाताने निर्माण झाला आहे, आणि माझे आयुष्य संपल्यावर माझा कणभरही मागमूस राहणार नाही, ही कल्पनाच माणसाला सत्य असली तरी सहन होत नाही. मग तो 'आत्मा' या संकल्पनेला जन्म देतो, त्याला अमरत्व देतो. 'मरणानंतर जुने कपडे टाकावेत तसा हा देह टाकला जातो, मात्र हा आत्मा अमरच असल्यामुळे अन्य देहात त्याची कारकीर्द चालू राहते', असे तो ईश्वराच्याच तोंडून वदवून घेतो. मग स्वर्ग, सुखच सुख आणि शेवटी अप्रतिहत आनंद देणारा 'मोक्ष'!

या कल्पनाविश्वाच्या अमलाखाली लक्षावधी धर्मानुयायी बिचारे दु:ख, उपासमार, रोगराई अशा

समस्यांशी विनातक्रार सामना करत असतात; कारण हे सर्व ईश्वरी इच्छेनुसार घडून येत आहे, अशी त्यांची खात्री पटवण्यात आलेली असते. हे सर्व सहन करा, पुढच्या जन्मात चांगले आयुष्य लाभेल, अशी आशाही दाखवण्यात आलेली असते. मात्र परमेश्वरी इच्छेनुसार चाललेल्या या व्यवस्थेविरुद्ध बंड कराल किंवा त्यात ढवळाढवळ कराल तर याद राखा, अशी भीतीही घातली जाते. छत्री वापरणे, कुटुंब नियोजन अशा समाजोपयोगी बाबीही इंग्लंड देशातील धर्मनिष्ठांना सहन होत नव्हत्या.

आता माझ्या शेवटच्या मुद्द्याकडे येतो. तो म्हणजे, आतापर्यंत जगापुढील समस्यांपैकी एकही समस्या धर्मामुळे दूर झाली आहे, असे झालेले नाही. (असंख्य समस्या निर्माण मात्र झाल्या आहेत!) दुष्काळ, अवर्षण, पूर, उपासमार, भूकंप, सुनामी, चक्री वादळे, साथीचे रोग, सर्पदंश, रेबीज, विंचूदंश, वणवे, भूस्खलन, हिमवादळे, उष्माघात, विजा पडणे अशा असंख्य आपत्ती जगाच्या सुरुवातीपासून चालूच आहेत. धर्मगुरूंनी यातून बचाव व्हावा म्हणून प्रार्थना, मंत्रपठण, पूजाविधी, यज्ञ, नवस, पशुबळी, क्वचित नरबळी, तपश्चर्या, उपास, आत्मक्लेश, ग्रहशांती असे अनेक उपाय योजले; अजूनही योजतात. यांतील एकाही उपायाचा एकही समस्या सोडवण्यासाठी एकदाही उपयोग झालेला नाही, हेही आपण जाणतो. याउलट, विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्या साहाय्याने लक्षावधी माणसे या आपत्तीतून वाचली आहेत आणि अशा प्रगतीला धर्मशास्त्र्यांनी नेहमीच विरोध केला आहे. एकच उदाहरण देतो. अमेरिकेत, इमारतींचे वीज पडण्यापासून रक्षण करण्यासाठी विद्युत्‌निवारक लावण्यास सुरुवात झाली. त्या वेळचे धर्ममार्तंड 'पापी माणसांना शासन करण्यासाठी ईश्वर वीज पाठवतो, ती रोखणे हे पाप आहे', असे सांगून त्याला कडाडून विरोध करत होते.

आता आपण जगापुढील प्रचलित प्रश्नांचा आढावा घेऊ आणि धर्म त्या बाबतीत काय करतो, तेही पाहू.

१. जागतिक शांतता आणि सामंजस्य – धर्म धर्मांतील लढाया कितीही वाईट असल्या, तरी आपण एकवेळ त्या समजू शकतो; पण गेल्या शतकात एकच धर्म असणारी अनेक राष्ट्रे भयंकर नरसंहार करत होती, तरीही तत्कालीन धर्मप्रमुख या हिंसेचे मूक साक्षीदार झाले होते.

२. आजही, शत कोट्यवधी डॉलर 'संरक्षण खर्च' या नावाखाली प्रत्येक देश खर्च करत आहे; पण कोणीही धर्माधिकारी या वेडगळ खर्चाविरुद्ध आवाज उठवत नाही, आणि मानवी दुःखे दूर करण्यासाठी हा पैसा वापरा, अशी मागणी करत नाही.

३. प्रचंड आर्थिक विषमता – ही अप्रगत आणि मागास राष्ट्रांत तर आहेच; पण श्रीमंत देशातील नागरिकांतही ती आहे. काही धार्मिक संस्था गरिबांना मदत करतात; पण समस्येच्या गांभीर्याच्या मानाने हे प्रयत्न अगदीच क्षुद्र असतात. बाहेर अर्धपोटी भिकाऱ्यांची रांग आणि देवळातील मूर्ती सोन्याने मढवलेली हे दृश्य पाहिल्यावर माझी मान शरमेने खाली झुकते.

४. सर्व जगभर भ्रष्टाचाराची साथ पसरली आहे. गरीब देशांत जास्तच. कोणीही धर्मप्रमुख याविरुद्ध आवाज उठवताना मी ऐकलेला नाही. तो निपटून काढायची चळवळ चालवणे तर सोडाच.

५. पर्यावरणहानी ही सर्व पृथ्वीला भेडसावणारी समस्या आहे, अनेक स्वयंसेवी संस्था आणि शासने त्याविरुद्ध लढत आहेत. पण कोणीही धर्मप्रमुख या विषयात मदतीचा हात देण्यासाठी पुढे आलेले नाहीत.

६. मानवी हक्कांचे दमन आज सर्वत्र होताना दिसते; पण त्याला विरोध सोडाच, अनेक धर्म त्याला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष हातभारच लावत असतात. अनेक धर्मांत स्त्रियांना दुय्यम स्थान देऊन त्यांच्यावर अन्याय केला जातो आणि हे त्यांच्या पूर्वजन्मीचे पाप आहे, किंवा ईश्वरी इच्छा आहे, असे अर्थहीन स्पष्टीकरण दिले जाते.

७. अनेक स्त्रियांना जबरदस्तीने देहविक्रय करण्यास भाग पाडले जाते. धर्म त्याविरुद्ध काहीही करत नाहीत.

८. ९० टक्के अंधश्रद्धा धर्मातून निर्माण होतात. धर्म अंधश्रद्धा निर्मूलनाला नेहमीच विरोध करतात, यात आश्चर्य ते काय?

ही यादी वाचल्यावर आजचे सर्व धर्म हे कालबाह्य झाले असून जगापुढील आजचे प्रश्न सोडवण्यास असमर्थ आहेत हे तुम्हाला पटले असेल.

जागतिक कीर्तीचे विद्वान आणि विचारवंत लक्ष्मण-








शास्त्री जोशी यांना मी एकदा विचारले होते की, 'जगातील प्रचलित धर्मांपैकी तुम्हाला कोणता आदर्श वाटतो?' त्यांनी तत्काळ उत्तर दिले, 'कोणताही नाही. सर्व धर्म कालबाह्य झाले आहेत.' पुढे ते म्हणाले की 'तरीही तुम्ही मला विचाराल तर मी म्हणेन की, डॉ. आंबेडकरांनी सांगितलेला परिष्कृत बौद्ध धम्म हा आदर्श म्हणता येईल. बौद्ध धम्मावर काळानुसार चढलेली तर्कहीन विचारांची कोळीष्टके आंबेडकरांनी झटकून टाकली आणि मानवता आणि विज्ञान यांवर आधारित धम्म सांगितला. हीच कोणत्याही आधुनिक धर्माची पायाभूत तत्त्वे असली पाहिजेत आणि ही अमलात आणली तर तुम्हाला फार पूर्वी गतप्राण झालेल्या धर्मांचे भूत कवटाळून बसावे लागणार नाही.'





अनुक्रमणिका

# धर्म आणि विज्ञान - स्फुट चिंतन

रवींद्र गोडबोले

'धर्म' या शब्दाचे वेगवेगळे अर्थ संदर्भानुसार लावता येतात; नव्हे, तसे ते लावलेही जातात. मला 'आध्यात्मिक जीवन' म्हणजे नेमके काय असते, हे समजू शकले नाही. एकूणच 'अध्यात्म' या विषयात मला काहीच समजत नाही. त्यामुळे या विषयावर काही मते देण्याचा अधिकारही माझ्याकडे नाही.

धर्म आणि विज्ञान यांची तूलना, त्यांच्यातील साम्ये, फरक, उद्दिष्टे यांच्यावर गेल्या १००-१५० वर्षांमध्ये बरेच काही लिहिले गेले आहे. कोणतीही फलनिष्पत्ती न झालेल्या अनेक चर्चाही विचारवंतांनी केल्या आहेत. सामान्य माणूस देवाधर्माकडे काय किंवा विज्ञानाकडे काय, मोठ्या श्रद्धेनेच पहात असतो. वैज्ञानिकांनी तर्काच्या आधारे मांडलेला सिद्धान्त हा सत्यच आहे, अशी त्याची श्रद्धा असते. त्यांच्या तर्कपद्धतीला आव्हान देण्याची, त्यातील त्रुटी शोधून काढण्याची बौद्धिक कुवत त्याच्याजवळ नसते. अनेक गमतीची आणि गंभीर उदाहरणे देऊन हा मुद्दा अधिक स्पष्ट करता येईल. जर गणिताच्याच भाषेत बोलायचे झाले तर –

० ———————————————— ∞

शून्य ते अनंत

या प्रवासात शून्य आणि अनंत या संकल्पनांना गणिताची सूत्रे व नियम लावता येत नाहीत; कारण त्यांना वैज्ञानिक परिभाषेत 'अस्तित्व' असू शकत नाही. भूमितीची सुरुवात ज्या 'बिंदू'पासून होते, त्या बिंदूला लांबी, रुंदी व उंची असत नाही; म्हणजे त्याचे अस्तित्व ही एक संकल्पना असते. 'अनंत' या संकल्पनेवर आधारित अनेक paradox उपलब्ध आहेत. १, २, ३, ४, ५, ..... अशा अनंत संख्या आहेत, तशाच २, ४, ६, ८, १० . .. अशा सम आणि १, ३, ५, ७, ९ ... अशा विषम संख्याही अनंतच आहेत. हा तर्कवाद म्हणजे परमेश्वराच्या अस्तित्वाचा पुरावा नव्हे किंवा विज्ञानाच्या मर्यादांची अवहेलनाही नव्हे. 'शून्य' आणि 'अनंत' या वैज्ञानिक परिभाषेत 'discontinuity' च्या जागा आहेत याची माहिती व्हावी, एवढाच मर्यादित उद्देश या विवेचनाचा आहे.

दुसरा मुद्दा असा की, विज्ञान या शब्दाने आपल्याला कोणकोणती शास्त्रे अभिप्रेत आहेत, याबाबत स्पष्टता असणे आवश्यक आहे. गणित, भौतिक व रसायन शास्त्र - physics & chemistry व त्यांच्या उपशाखा हा एक गट मानता येईल. त्यांच्या उपयोजनामुळे (application) निर्माण झालेली अभियांत्रिकी (engineering) शास्त्रे हा दुसरा गट होईल. जीवशास्त्र (biology), त्याच्या उपशाखा असा तिसरा गट होईल. यांखेरीज अनेक शास्त्रे–अर्थशास्त्र, समाजशास्त्र मानववंशशास्त्र, भूगर्भशास्त्र, खगोलशास्त्र .... ही यादी कितीही वाढविता येईल. या शास्त्रांमध्ये विज्ञानाचे योगदान किती, श्रद्धा आणि परंपरांचा भाग किती आणि त्यांची विश्वासार्हता कशी आणि कोणी ठरवायची, हा एक वेगळ्या चर्चेचा विषय होऊ शकतो. आधुनिक मानवाच्या विचार करण्याच्या पद्धतींवर या गटामधील शास्त्रांचा आणि या शास्त्रांमध्ये झालेल्या संशोधनाचा फार मोठा प्रभाव आहे, हे नाकारता येणार नाही. अर्थशास्त्र, समाजशास्त्र, मानववंशशास्त्र अशा शाखांना जर विज्ञान म्हणून मान्यता द्यायची असेल तर; किंवा अशी शास्त्रे म्हणजे विज्ञान नसेल तर त्यांची धर्माशी तूलना करताना कोणता दृष्टिकोण स्वीकारायचा, असा वेगळाच मुद्दा उपस्थित होण्याची शक्यता आहे.

धर्म आणि विज्ञान या विषयांबद्दल विचार करीत असताना मला एक मुद्दा असा आढळला की, ज्याच्यावर या संदर्भात फारशी चर्चा झालेली निदान माझ्या वाचनात तरी आलेली नाही. तो मुद्दा असा की, विज्ञानाने श्रद्धेचे अस्तित्व व परिणामकारकता ही वैद्यकीय क्षेत्रामधील काही उपचारपद्धतींबाबत सिद्ध करून दाखविली आहे. placebo effect हा वैज्ञानिकांनी मान्य केला आहे. जर

अनुक्रमणिका

डोकेदुखीसारखा आजार डॉक्टरने दिलेल्या placebo - ज्यात कोणतेही औषध नाही - गोळीमुळे बरा होत असेल, तर मांत्रिकाच्या मंत्रांमुळे भूतबाधाही दूर होत असेल, हे मान्य करणे भाग आहे. अशा उदाहरणांमध्ये उपचारपद्धतीच्या परिणामकारकतेचा प्रश्नच उद्भवत नाही. व्याधीने पीडित असलेला माणूस कोणत्या श्रद्धा किती तीव्रतेने बाळगतो, हे अशा उदाहरणांमध्ये सर्वांत महत्त्वाचे असते. स्युडोप्रेग्नन्सी, घोस्ट लिम्बस्, प्लॅसिबो सर्जरीज् अशी आणखी अनेक उदाहरणे या संदर्भात देता येतील. जर गणिती भाषेत बोलायचे तर मानवी मेंदू व त्यामधील पेशींची परस्परजोडणी संपर्क आणि मेंदूचे कार्य यातील भौतिक घटक व क्रिया या 'अनंत' संकल्पनेच्या जवळ जाणाऱ्या आहेत. या ठिकाणी गणित व विज्ञानाचे सर्व नियम काटेकोरपणे लागू होण्याच्या शक्यता फार कमी आहेत. योगासारखी प्राचीन भारतीय शास्त्रे (= विज्ञान?) या बाबतीत काय सांगतात, ते पाहणे कदाचित उद्बोधक ठरू शकेल.

मी जेव्हा 'धर्म' या संकल्पनेचा विचार करीत असतो, तेव्हा धर्माचे सामाजिक स्वरूप मला मानवी जीवनाच्या संदर्भात अधिक चिंतनीय वाटते. महाभारतकारांनी, 'यद् धारयति स धर्मः'– जो धारणा करतो तो धर्म – अशी धर्माची एक वरकरणी सोपी व सुटसुटीत व्याख्या केली आहे. ही धारणा व्यक्ती, तिचे, कुटुंब, जात, गाव, राष्ट्र अशी विस्तारित होत जाते. यातील प्रत्येक संस्थेची धारणा म्हणजे संरक्षण व संवर्धन होणे गरजेचे असेल तर यातील प्रत्येक संस्थेच्या स्वातंत्र्य व अधिकारांवर काही मर्यादा असणे आवश्यक आहे, असे महाभारतकारांचे मत दिसते. एका अर्थाने महाभारतकारांनी प्रतिपादित केलेला 'सनातन धर्म' संपूर्ण स्वातंत्र्य या कल्पनेच्या ठाम विरोधात आहे.

दुसरा महत्त्वाचा मुद्दा असा की, महाभारतकार 'धर्म' या संकल्पनेचा (पुरुषार्थाचा!) सुटा विचार करणे चुकीचे, नव्हे, हानिकारक आहे असे समजताना दिसतात. त्यांच्या मतानुसार धर्म, अर्थ आणि काम या परस्परावलंबी आणि परस्परपूरक अशा संकल्पना आहेत. यासंबंधीचे सविस्तर विवेचन मी माझ्या, 'महाभारत – संघर्ष आणि समन्वय' या पुस्तकातील एका प्रकरणात केले आहे. ते इथे उद्धृत करता येईल.

या प्रतिपादनाचा एक अन्वयार्थ असा लावता येईल की, धर्माचा मुख्य संघर्ष विज्ञानाशी नसून तो राज्यघटना आणि आधुनिक कायदेप्रणाली यांच्याशी असतो. त्यातही गुन्हेगारी कायदे व त्यांनुसार होणाऱ्या शिक्षा यांच्याशी धर्माचे तीव्र भांडण नसते. सामाजिक कायदे, नीति-नियम, रीती-रिवाज व परंपरा यांच्यामध्ये जेव्हा बदल घडून येतात, तेव्हा धर्माचा आधुनिक कायदेप्रणाली व त्यांना अस्तित्वात आणणारे पुरोगामी विचारवंत यांच्याशी संघर्ष सुरू होतो. डॉ. नरेन्द्र दाभोळकर यांची हत्या व त्यानंतर अमलात आणलेला अंधश्रद्धाविरोधी कायदा या नुकत्याच घडलेल्या घटना लक्षात घेतल्या, तर या संघर्षाचे स्वरूप व त्याला असणारे वेगवेगळे पदर समजण्यास थोडीफार मदत होऊ शकेल.

मुळात धर्म हा त्याच्या सामाजिक स्वरूपात स्वातंत्र्याच्या – अनिर्बंध व मुक्त व्यक्तिस्वातंत्र्याच्या – विरोधात ठामपणे उभा असतो. पुरोगामी विचारसरणी व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार मोठ्या हिरिरीने करीत असते. समलिंगी व्यक्तींच्या विवाहाला मान्यता देणारे कायदे आता सर्व प्रगत देशांमध्ये लागू आहेत आणि या देशांमधील धर्मसंस्था या कायद्यांना प्रखर विरोध करीत आहेत. हे या संघर्षाचे एक उदाहरण देता येईल. याच्या पुढच्या पायरीवर माणसाने पशूशी शरीरसंबंध ठेवणे मान्य करणे अपरिहार्यपणे समोर येईल.

धर्म हा व्यक्तीला तिच्या कुटुंबाशी, ज्ञातीशी, गावाशी आणि राष्ट्राशी घट्टपणे बांधून ठेवीत असतो. आधुनिक विचारसरणीने अजूनपर्यंत व्यक्तीला राष्ट्राशी बांधून ठेवले आहे. परंतु येणाऱ्या काळात ग्लोबल व्हिलेजच्या संकल्पनेत ही बांधिलकी क्षीण होत जाणे सहज शक्य आहे. बांधिलकीमध्ये जबाबदारी आणि कर्तव्यभावना अभिप्रेत असते. स्वतंत्र व्यक्ती जर कोणतीच बांधिलकी मानण्यास तयार नसेल, तर त्यासाठी कायद्याचा आधार घेणे पुरोगामी विचारवंतांनाही भाग पडते. अखेरीस सामाजिक स्वरूपातील धर्म काय किंवा आधुनिक कायदे काय, ते समाजापुढे असणाऱ्या समस्यांमधून मार्ग काढण्यासाठीच निर्माण होत असतात. धर्माच्या बाबतीत ही क्रिया सावकाशपणे होणाऱ्या उत्क्रांतीची असते, तर कायद्यांमुळे

क्रांतिकारक बदल करता येतात.

स्वातंत्र्य, समता आणि बंधुत्व या मूल्यांचा उद्‌घोष फ्रेंच राज्यक्रान्तीनंतर करण्यात आला. त्याआधीचे सगळे जगच विषमतेवर आधारलेले आणि स्वातंत्र्यावर बंधने घालणाऱ्या सत्तांनी आणि त्याचे समर्थन करणाऱ्या तत्त्वज्ञानांनी भारलेले होते. त्यानंतर व्यक्तिस्वातंत्र्याचा प्रसार प्रगत देशांमध्ये मोठ्या झपाट्याने झाला. त्याला अनुकूल अशी आर्थिक परिस्थितीही गेल्या दोन शतकांमध्ये प्रगत देशांची होती. एकतर औद्योगिक क्रान्तीमुळे या देशांची उत्पादनक्षमता खूपच वाढली होती आणि त्यांच्या वसाहतींमधून कच्चा माल विकत घेण्याची आणि पक्का माल/उत्पादित वस्तू वसाहतींमध्ये विकण्याची आणि या दोन्ही व्यवहारांमध्ये नफा कमाविण्याची उत्तम व्यवस्था त्यांच्याकडे होती. प्रगत राष्ट्रांमध्ये रूजत असलेल्या व्यक्तिस्वातंत्र्याचे बीज वसाहतींमधील लोकांच्या गुलामगिरीच्या खतपाण्यावर पोसले जात होते. धर्म आणि विज्ञान यांमधील वादाला प्रारंभही याच काळात आणि मुख्यतः प्रगत राष्ट्रांमध्ये झाला हे लक्षात घेतले, तर भारतीय समाजाच्या संदर्भात आणि आजच्या काळात या वादाला किती महत्त्व असावे, याचे वस्तुनिष्ठ मूल्यमापन करता येईल. बऱ्याच विचारवंतांना पडलेला हा खरा प्रश्न आहे.

माझ्या मनात असलेली आणखी एक शंका अशी की, व्यक्तीला संपूर्ण विचारस्वातंत्र्य आणि मोठ्या प्रमाणात आचारस्वातंत्र्य मिळाल्यानंतर ती व्यक्ती समता आणि बंधुभावाच्या मार्गाने जाईल, अशी व्यवस्था निर्माण करणे शक्य आहे काय? स्वातंत्र्य मिळाल्यानंतरचा एक मार्ग विषमताविद्वेष असाही असू शकतो. व्यक्तीला या मार्गावरून परावृत्त करणारी यंत्रणा शिक्षणसंस्था व कायदे मंडळ यांच्यामार्फत उभी करणे शक्य आहे का? एक छोटे उदाहरण देऊन हा मुद्दा स्पष्ट करता येईल. 'शेजारधर्म' हा शब्द सर्वांना परिचित आहे. हा धर्म 'धारणे' साठी उपयुक्त असेल, तर तो कसा शिकविता येईल?... रस्त्यावरील अपघातात जखमी होऊन पडलेल्या व्यक्तीच्या मदतीला धावून जाणाऱ्यांची संख्या समाजात कमी होत असेल, तर त्यामागे धर्म आणि कायदा यांच्यामधील संघर्ष उभा आहे ही बाब आपण नीट समजून घेतली पाहिजे.

या विवेचनाचा उद्देश धर्माची भलावण करणे किंवा पुरोगामी विचारसरणीवर टीका करून त्यातील उणिवा किंवा दोषास्पद स्थळे दाखवून देणे हा निश्चितच नाही. प्रत्येक Ism ला – 'वादा' ला– काही मर्यादा असतात, तशा त्या पुरोगाम्यांनाही आहेत. गुलामगिरी जितकी दुष्ट व घातक असते तसेच संपूर्ण स्वातंत्र्यही समाजासाठी घातक ठरू शकते, हे मान्य करण्याची वेळ आता कदाचित जवळ आली आहे.

समाजधुरिणांना समाजाचे नेतृत्व करायचे असते, समाजाच्या बौद्धिक आणि भौतिक विकासाची काळजी घ्यायची असते. महाभारतकारांच्या भाषेत, 'समाजाचे अर्थ आणि काम नियंत्रित करायचे असतात.' भारतीय परंपरेनुसार हे काम ऋषि-मुनी आणि राजे करीत असत. समाजनियंत्रणात 'लोकतंत्राचा' म्हणजेच पंचायतींचा मोठा सहभाग असे. या पद्धतीच्या गुणदोषांवर स्वतंत्रपणे चर्चा करता येईल. परंतु गेल्या १००-१५० वर्षांत ही पद्धत पूर्णतः लयास गेली. लोकशाही व्यवस्थेचा स्वीकार केल्यावर आता समाजनियंत्रणाचे काम लोकनियुक्त प्रतिनिधींकडे आणि न्यायदानाचे काम इंग्रजांनी आणलेल्या न्यायपालिकेकडे गेले आहे. या पुरोगामी आणि विज्ञानाधिष्ठित (?) संस्था किती कार्यक्षम आहेत व त्यांच्यात कशी सुधारणा करता येईल, हासुद्धा एका स्वतंत्र चर्चेचा विषय आहे.

विज्ञानाच्या वापरामुळे जेव्हा लोकांचे जीवन अधिक सुखकर होत असते, तेव्हा लोकच त्याचा स्वीकार करीत असतात. धर्माने (धर्म - एकेश्वरी संप्रदाय वगळता?) त्यात आडकाठी आणली, तरी फार मोठा संघर्ष न होता विज्ञानाचा स्वीकार लोकजीवनात होत असतो.

धर्म आणि विज्ञान मानवी समाजाच्या इतिहासात नेहमीच एकमेकांसोबत राहिले आहेत. पुढेही ते तसेच राहणार आहेत. यांतील एक नष्ट होण्याची शक्यता जवळपास शून्याइतकी आहे.



अनुक्रमणिका

# पावसानंतरचे ऊन

रमेश पानसे

माणसाच्या मुलावर जन्मत: धर्म लादला जातो, ही व्यथित करणारी घटना आहे. प्राण्यांच्या बाबतीत असे घडत नाही. त्यांना धर्म नसतो; निसर्गदत्त असा फक्त 'स्वधर्म' असतो. जगणे – मैथून आणि मृत्यू या जीवनचक्राबाहेर त्यांचे जीवन युगानुयुगे गेलेले नाही. प्राण्यांना नाही अशी एक महान गोष्ट माणसाला प्राप्त झाली आहे. ती म्हणजे विकसित आणि विकसित होणारा मेंदू. या मेंदूच्या जोरावर माणसाने मोठे भौतिक कर्तृत्व दाखविले आहे. तसेच अफाट कल्पनाशक्तीचेही विश्व निर्माण केले आहे. विविध कलांचे नि साहित्याचे, मानवी जीवनातील हे याचेच प्रगल्भ द्योतक आहे. 'देवा'ची संकल्पना ही अशीच एक मानवाच्या उत्तुंग कल्पनाशक्तीतून साकार झालेली साहित्यिक संकल्पना आहे. देव नसला तरी देव आहे असे वाटावे; देव नसावा असे मनोमन पटत असतानाच, देव असावा असेही वाटावे; मानवाने 'देवा'ची निर्मिती केलेली असली तरी देवानेच मानवाची निर्मिती केली आहे अशी श्रद्धा निर्माण व्हावी, इथपर्यंत नि हजारो वर्षे मानवी मनावर पगडा बसवणारी देवाची संकल्पना हे मानवाचे शास्त्रज्ञान-तंत्रज्ञान विकासाइतकेच मोठे बौद्धिक कर्तृत्व आहे. त्यामुळे कल्पनाशक्तीचे विशाल रूप त्यामध्येही दृग्गोचर झालेले आहे. एवढेच नव्हे तर देवाच्या संकल्पनेइतकाच मानवी मनाचा ताबा, धर्माच्या संकल्पनेने घेतला आहे. देव जेवढा विशिष्ट समुदायाच्या मनात रुजला आहे, तेवढाच धर्म त्यांच्या सामाजिक नि सांस्कृतिक वागणुकीचे अधिष्ठान म्हणून व्यवहारात दाखल झाला आहे.

माणसाच्या नित्याच्या वागणुकीशी अशी धर्माची सांगड घातल्याने, माणसाला तो आपल्या जीवनाचा अविभाज्य भाग आहे, असे वाटू लागले. आणि त्याचे हे असे वाटणे, समाजात परंपरेने रूढ केलेल्या, देवळांसारख्या नि धर्मगुरू नि धर्मपीठांसारख्या व्यवस्थांनी अधिकाधिक घट्ट करत नेले. समाजातल्या कित्येक माणसांना, आपल्या जगण्याचे साधन असलेला व्यवसाय म्हणून या व्यवस्था टिकविणे, आणि शक्य झाल्यास वाढवणे गरजेचे वाटू लागले. त्यातून एका अलिखित कायद्याची निर्मिती झाली. धर्म ही गोष्ट माणसाच्या जन्माशी जोडली गेली. आई-बापांचा धर्म आपोआपच मुलांना दिला गेला; त्यांच्यावर लादला गेला. त्यामुळे आता आपला मृत्यूही धर्मांतर्गतच होतो.

धर्म हा असा आपल्या जीवन-मरणाशी चिकटवला गेला आहे, ही अतिशय व्यथित करणारी गोष्ट आहे. धर्म हा असा आपल्या जीवनाचा अविभाज्य घटक झाला आहे, ही सामाजिक दृष्ट्या अतिशय क्लेशकारक घटना आहे. आपले असंख्य व्यक्तिगत, सामाजिक आणि राजकीय प्रश्नांचे मूळ, या धर्मकल्पनांचा आपल्या मनावर जो पगडा बसलेला आहे, त्यात दडलेले आहे. आज जगातील बहूसंख्य लोकांचा फार मोठा वेळ, शक्ती नि पैसाही तथाकथित धर्मकारणासाठी नि त्यातून निर्माण झालेल्या विविधांगी प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी वाया जातो आहे; एवढेच नव्हे तर देव नि धर्म यांचा मनाला होणारा जाच कित्येकांच्या बाबतीत वैयक्तिक कार्यक्षमतेला नि कर्तृत्वाला बाधा ठरत आहे.

असाही अनुभव येतो की, धर्मकल्पनेशी जखडलेल्या अवस्थेत माणसाची स्वतंत्रपणे विचार करण्याची शक्तीच हळूहळू लोप पावू लागते. जो विचार करावयाचा, मग तो स्वत:विषयीचा असो, आजूबाजूच्या समाजाविषयीचा असो अथवा राष्ट्राविषयीचा असो, तो धर्मांतर्गतच संकुचित केला जातो. धर्मापल्याड जाऊन मानवी समुदायाचा, मानवी जीवनाचा विचार करण्याचे सामर्थ्यच तो गमावून बसतो.

धर्म हा मानवी समाजाचा एक अविभाज्य घटक झाला असला तरी तो आवश्यक घटक नाही, हे पटवून घेणे माणसाला कठीण जाते आहे. ही खरी माणसाच्या भविष्याविषयी चिंता करावी अशी गोष्ट आहे. मनाला

अनुक्रमणिका






धर्मबंधनात जखडून ठेवले की, धर्माशी फारकत घेण्याचा विचार सुचत नाही; सुचला तरी तो पटत नाही; आणि पटला तरी तो अंमलात आणण्याचे धाडस होत नाही. आणि मग असेही घडते की, एक व्यावहारिक शहाणपण म्हणून आपण तो विचार सोडूनच देतो.

विचार हासुद्धा स्वतंत्रतेच्या वातावरणातच फुलतो नि फळतो. व्यक्तिगत किंवा सामाजिक जीवनात परिवर्तन घडवून आणायचे असेल, तर माणसाने स्वतंत्र विचार करण्याची आपली शक्ती दूषित होऊ देता कामा नये. आपण धर्मसंकल्पनेशी बांधलेल्या आपल्या मनाच्या साखळ्या जरा सैल केल्या, तरी स्वतंत्र विचारशक्तीचे वारे आपल्याभोवती खेळू लागतात. पाऊस पडून गेल्यानंतर उन्हासारखे निर्मळ नि ताजेतवाने वाटू लागते.

भूतकाळातील माणसाने आपल्या अफाट कल्पनाशक्तीच्या जोरावर धर्मकल्पनेला जन्म दिला; त्याच कल्पनाशक्तीच्या उत्तुंग भरारीने आता धर्मातील अशा मानवी जीवनाची संकल्पना आपण खचितच जन्माला घालू शकतो.

आपण स्वत:पासून सुरुवात करू शकतो. आपण स्वत:ला धर्मातीत मानू शकतो; नव्हे, आपण स्वत:ला धर्मातीत नेऊ शकतो. या धर्मातीत होण्याच्या प्रवासात आपल्याबरोबर आणखीही कोणी येतील, अशी खात्री बाळगू शकतो. धर्म असलेल्या जीवनाकडून धर्म नसलेल्या जीवनाकडे सारा समाज वाटचाल करील, असे स्वप्न आपण पाहू शकतो.

आता, धर्मातीत समाजाच्या संस्थापनेसाठी आपण प्रस्थान ठेवू या.





अनुक्रमणिका








# धर्म आणि विज्ञान

श. रा. बोटे

**प्रस्तावना : धर्म व विज्ञानातील फरक**

प्रचलित विज्ञानाच्या आधारावर हे विश्व साधारण १४ अब्ज वर्षांपूर्वी, पृथ्वी ४.५ अब्ज वर्षांपूर्वी, पहिला सजीव ३.५ अब्ज वर्षांपूर्वी आणि माकडापासून माणूस उत्क्रांत साधारण ७० लाख वर्षांपूर्वी झाला. या सर्वांची उत्पत्ती झाली तेव्हा धर्म नव्हता, मात्र विज्ञानाला ज्ञात असणारी, विश्वाला निर्माण करणारी, त्यांचा विकास करणारी आणि लय करणारी तत्त्वे, शक्ती त्याही वेळी होती, आताही आहेत आणि विश्वाच्या अंताच्या वेळेही असणार आहेत.

धर्म आणि धार्मिक कल्पना, त्याचबरोबर स्वर्ग, नरक, मोक्ष, ईश्वर, आत्मा यांसारख्या संकल्पना मानव-निर्मित आहेत. माणसाच्या मनातील भीती, भावनिक गुंता, बुद्धिमत्तेचा तोकडा विस्तार, निसर्गातील उत्पात आणि विश्वातील अगोचर घटनांमुळे त्याला ईश्वर आणि धर्म या संकल्पनांच्या आधाराला बळी पडावे लागले. तत्त्वतः बऱ्याच धर्मांतील काही तत्त्वे, वचने आणि संकल्पना जरी सारख्याच वाटल्या, तरीसुद्धा त्या नैसर्गिक आणि वास्तववादाच्या निकषावर भिन्न दिसून येतात. याउलट, विज्ञान ज्या संकल्पनांवर आधारित आहे, त्याच तत्त्वावर आणि त्याच विचारधारेशी विश्वाचा आणि निसर्गाचा चालू असणारा अव्याहत व्यापार सुसंगत दिसून येतो. विश्वातील प्रत्येक अवस्थेला, त्याच्या विकासाला आणि लयाला भौतिकशास्त्राचे/जीवशास्त्राचे नियम लागू पडतात. धार्मिक कल्पना आणि संकल्पना या बऱ्याच वेळा ज्ञानेंद्रियांच्या पलीकडच्या आहेत. मात्र विज्ञानातील संकल्पना या ज्ञानेंद्रियांच्या कक्षेत आहेत. आधुनिक विज्ञानातील काही अमूर्त कल्पनाही काही विशिष्ट गणितीय भाषेच्या आधारे अथवा गुंतागुंतीच्या उपकरणाद्वारे मानवी ज्ञानेंद्रियांच्या कक्षेत आणल्या गेल्या आहेत.

विज्ञान हे उत्तरोत्तर प्रगती करणारे (Progressive) आणि बदल स्वीकारणारे चलस्वरूपात दिसून येते. (या ठिकाणी डायनॅमिकचा अर्थ त्याच्यातील त्रुटी बाजूला करून सत्याच्या जवळ जाणाऱ्या संकल्पनांचा, तत्त्वांचा आणि नियमांचा स्वीकार करणे या अर्थाने घेतला आहे.) याउलट, धर्म अचल (Static) आणि कर्मठ प्रवृत्तीचा आहे. यांच्यातील विचारधारा, संकल्पना, तत्त्वे आणि विचार ही निरूढीय (Absolute) असल्याने त्यांचा विकास झालेला दिसत नाही उलट विज्ञान अप्रगत अवस्थेतून प्रगत, अतिप्रगत आणि नावीन्यपूर्ण कल्पनांवर विस्तारित होत गेलेले दिसते आहे.

विज्ञान आणि धर्म या दोहोंमधील दुसरा मूलभूत फरक हा आहे की, विज्ञान हे विवेकवादावर आधारित असून निरीक्षण आणि प्रयोग हा त्यांचा प्रमुख गाभा आहे. याउलट, धर्म हा श्रद्धेच्या पायावर उभा आहे. धर्म आणि अध्यात्म यांच्यातील संकल्पना गणितीय भाषेत मांडता येत नाहीत. त्यामुळे सभोवताली घडणाऱ्या भौतिक घटनांचे आकलन आणि त्यांची मीमांसा धर्माच्या आणि अध्यात्माच्या तत्त्वज्ञानावर करता येत नाही. उलट, विज्ञान सत्याच्या अंतिम टप्प्यापर्यंत जरी पोचत नसले, तरी ते सत्याच्या जास्तीत जास्त समीप पोचण्याचा प्रयत्न करते. विज्ञान हे स्वप्रत्ययी तर आहेच आहे; परंतु ते परप्रत्ययी-सुद्धा आहे. धर्म व्यक्तिनिष्ठ (Subjective) असून विज्ञान हे वस्तुनिष्ठ (Objective) आहे. विज्ञानाने तंत्रज्ञानाला जन्म दिला आणि मानवी जीवनात क्रांती घडवून मानवी जीवनशैली बदलून टाकली.

वैज्ञानिक सत्य हे सापेक्ष असून विज्ञान कधीच निर्विवाद (Absolute) सत्याचा पुरस्कार करत नाही. (या विधानाचा अर्थ : जे आज आपण सत्य म्हणून स्वीकारतो, ते कदाचित उद्या केलेल्या प्रयोगाद्वारे आणि निरीक्षणाद्वारे असत्य म्हणून घोषित करावे लागेल.)

विज्ञानाची उत्तरोत्तर जशी प्रगती होत गेली, तस-तसा धर्माचा पाया ठिसूळ बनत गेला. कारण विज्ञानाने स्वतःच्या विश्लेषण पद्धतीने आणि प्रायोगिक पद्धतीने










धार्मिक तत्त्वांचा आणि त्यांच्या सत्यतेचा शोध घेतला आणि ही तत्त्वे आणि विचारधारा चुकीच्या आणि असत्य आहेत हे दाखवून दिले.

विज्ञान त्या अर्थाने धर्माच्या मानाने सत्याच्या जवळ असले, तरीसुद्धा विज्ञानाच्या स्वतःच्या अशा काही मर्यादा आहेत. प्रत्येक माणसाच्या ठायी काया, चैतन्य आणि आत्मा यांचा संगम आहे. सध्याचे विज्ञान फक्त काया या स्थूल गोष्टीचाच विचार करते आणि चैतन्य अथवा आत्मा या अस्थूल गोष्टीविषयी काहीच भाष्य करत नाही. विज्ञानाच्या साह्याने जरी माणसाला भौतिक सुविधा आणि ऐषाराम मिळाला, तरी विपत्तीच्या आणि निसर्गातील रौद्रस्वरूप भीषण अशा आपत्तिकाळात किंवा मानवी जीवनातील अगतिक क्षणी धर्म अथवा अध्यात्म पुष्कळदा माणसाला जगण्याची उमेद, संकटावर मात करण्याची शक्ती देते. धर्म मानवी जीवन समृद्ध बनवतो. जीवनमूल्ये, बंधुत्व, नात्यानात्यांतील संवाद आणि विसंवाद आणि प्रेम यांची शिकवण धर्म देतो. परंतु विज्ञान वर उल्लेखलेल्या जीवनातील शाश्वत मूल्यांचा विचार करत नाही.

**पुंजयामिकी आणि धर्म (Quantum Mechanics and Religion) :**

कोणत्याही भौतिक घटनांचे आकलन आणि त्यांचा अभ्यास 'पुंजवादा'च्या साह्याने अधिक अचूक रीत्या करता येतो यात शंकाच नाही आणि हे माहिती-तंत्रज्ञानाच्या आणि गणनप्रक्रियेतील तंत्रज्ञानाच्या विकासावरून वारंवार सिद्ध झाले आहे. कारण या सर्व तंत्रज्ञानाचा मूळ पाया हा पुंजवादावर आधारित आहे. तरीसुद्धा एखाद्या वस्तुनिष्ठ वास्तवतेशी निगडित असणारी पुंजवादाची सैद्धांतिक बाजू अथवा परिभाषा ही अधिक गोंधळात टाकणारी आहे. त्यामुळे म्हणा किंवा पुंजवादाच्या एकंदरीतच अमूर्त (Abstract) स्वरूपामुळे म्हणा, अनेक भौतिक संशोधकांमध्ये एखाद्या भौतिक घटनेची मीमांसा करताना किंवा ती ज्या भौतिक सत्यावर आधारित आहे त्या सत्याच्या रचनेविषयी किंवा त्या सत्याच्या स्वरूपाविषयी बोलताना एकमत होत नाही आणि संदिग्धता वाढत जाते.

न्युटनने मांडलेल्या भौतिक विश्वातील निश्चिततेच्या तत्त्वाविरोधात (Deterministic Principle) पुंजवाद उभा राहतो. पुंजवाद हा कोणत्याही भौतिक गोष्टीच्या अंतिम सत्याविषयी ठामपणे काही सांगत नाही. कारण पुंजवादाच्या सिद्धान्तानुसार भौतिक जगाचे स्वरूप, त्याची सत्यता हे जोपर्यंत आपण त्याचे मोजमाप अथवा निरीक्षण करत नाही तोपर्यंत एका स्वरूपात असते आणि जेव्हा त्याचे आपण निरीक्षण अथवा मोजमाप करतो तेव्हा ती एका दुसऱ्याच म्हणजेच भिन्न स्वरूपात असते. थोडक्यात एकाच भौतिक गोष्टीचे स्वरूप हे पुंजवादाच्या सिद्धान्तानुसार निरीक्षण अथवा मोजमाप करण्यापूर्वी आणि केल्यावर भिन्न आणि वेगळे असते. पुंजवादाच्या या अभ्यासातूनच 'जॉन व्हिलर' हा भौतिक संशोधक म्हणतो, 'कोणतीही प्राथमिक भौतिक घटना ही जोपर्यंत आपण तिचे निरीक्षण अथवा मोजमाप करत नाही तोपर्यंत ती वास्तवात आहे, असे म्हणू शकत नाही.' याच आणि अशाच आशयाचे मत मांडताना नोबेल पारितोषिकविजेते भौतिकीतज्ज्ञ ऊजन वायग्नर म्हणतात, 'आपल्या सभोवतालच्या भौतिक जगाचा अभ्यास आणि निरीक्षण करत असताना आपली जाणीव कोणत्या प्रकारची आहे (Content of consciousness) यावरच त्या भौतिक जगाची अंतिम सत्यता आणि वास्तवता अवलंबून आहे आणि म्हणूनच माणसाची जाणीव हीच खरी वास्तवता अथवा अंतिम सत्य आहे.' पुंजवादाचा हा गर्भित अर्थ आहे. व्हॉन न्यूमन यांनीही माणसाच्या जाणिवेशिवाय कोणतीच गोष्ट वास्तवातील सत्य असू शकत नाही; प्रत्येक गोष्टीतील किंवा भौतिक व आधिभौतिक घटनेतील अंतिम सत्य हा मानवी जाणीवेचा एक भाग आहे', अशा प्रकारचे मत मांडलेले दिसते. पुंजयामिकीवर संशोधन करणाऱ्या या आणि यांसारख्या असंख्य संशोधकांनी मानवी जाणीव हीच एक अतिशय महत्त्वाची बाब आहे व त्यायोगे एका विशिष्ट प्रकारात सत्य आपल्या समोर येते, असे मत मांडले आहे. म्हणूनच जाणिवेला वास्तववादी भौतिक जगाचा बायप्रॉडक्ट म्हणून संबोधता येणार नाही. हे तत्त्व अठराव्या शतकात 'ॲग्लिकन बिशप बर्कलेनी (Anglican Bishop Berkeley) मांडलेल्या 'to be is to be perceived' या धार्मिक तत्त्वाशी बऱ्याच अर्थाने सुसंगत आहे. बिशप पुढे मांडतात,

'जोपर्यंत सत्यांचा शोध घेणाऱ्या माणसाच्या मनात निरीक्षक म्हणून त्या गोष्टीचे अस्तित्व नाही, तोपर्यंत ती गोष्ट वास्तवता अथवा अंतिम सत्य म्हणून भौतिक जगात अवतरू शकत नाही.'

याप्रमाणे बऱ्याच वेळा आणि बऱ्याच ठिकाणी धार्मिक संकल्पना आणि वैज्ञानिक संकल्पना सारख्याच किंबहुना एकच दिसून येतात. परंतु माझ्या मते यामध्ये मला दोन मूलभूत फरक दिसून येतात.

१. धर्म आणि धर्माचा विकास होताना बऱ्याच वेळा एकमेकांस छेद देणाऱ्या (Contradictory principles) संकल्पना मांडण्यात आलेल्या दिसतात. त्यांची मांडणी करताना एकच एक परिभाषा नसल्याने त्यांची मीमांसा करताना विविध अर्थबोध आणि इंटरप्रिटेशन संभवू शकतात. याउलट, विज्ञानामध्ये मांडणी करण्यात आलेली तत्त्वे, नियम आणि संकल्पना गणितासारख्या एकाच प्रगल्भ परिभाषेत असल्याने त्या एकमेकांशी सुसंगत आणि तार्किकतेचा भंग कुठेही न करणाऱ्या दिसून येतात.

२. या दोहोंमध्ये मला दुसरा मूलभूत फरक जाणवतो. म्हणजे धर्म-संकल्पना अथवा तत्त्वांचे व त्यातून दिग्दर्शित होणाऱ्या अथवा ध्वनित होणाऱ्या अर्थाचे कल्याणकारी उपयोजित तंत्रज्ञानामध्ये रूपांतर करण्यात धार्मिक तत्त्ववेत्ते असफल झालेले दिसतात. याउलट, पुंजयामिकीसारख्या प्रगल्भ भौतिकशाखेतील अमूर्त तत्त्वांचे व त्यातून दिग्दर्शित अथवा ध्वनित होणाऱ्या अर्थांचे कल्याणकारी उपयोजित तंत्रज्ञानांमध्ये रूपांतर करण्यात भौतिक तत्त्ववेत्ते आणि संशोधक यशस्वी झालेले दिसतात. एकाच प्रकारच्या कारणामुळे एक आणि एकच परिणाम घडून येतो या सत्याला अव्हेरून एकाच प्रकारच्या कारणामुळे प्रत्येक वेळी विविध भौतिक परिणाम घडून येऊ शकतात, या तत्त्वांचा पुंजवाद पुरस्कार करतो.

त्यामुळे पुंजवाद पुष्कळदा 'रॅडिकल फ्रीडम' (Radical Freedom) या तत्त्वज्ञानाच्या जवळच आहे, असे आपल्याला वाटते. यामुळे 'न्यूटॅनियन' भौतिक, वादातील 'निश्चिततेच्या तत्त्वाचा' (Deterministic Principle) त्याग करून पुंजवाद 'अनिश्चिततेच्या तत्त्वाचा' (Indeterministic Principle) अंगीकार करतो, असे दिसून येते.

विज्ञानाशिवाय सामान्य माणसाच्या जीवनाला गती नाही. परंतु जीवनातील दुसरीही एक बाजू अशी आहे की, आपण कोठून आलो आणि आपण कोठे जाणार आहोत आणि त्याचबरोबर जन्म आणि मृत्यू यांविषयीची गुढता त्याला गोंधळून टाकते, अगतिक बनवते आणि त्यामुळेच सामान्य माणूसच काय परंतु संशोधकसुद्धा ईश्वर, धर्म आणि अध्यात्म या संकल्पनांच्या प्रभावाखाली येतात. जीवनातील अगतिकता आणि प्राणांतिक दुःखाच्या (Agony) क्षणी त्याला धर्मची गरज भासते. कदाचित याच कारणामुळे असेल, भौतिक अर्थाने अतिप्रगत असणाऱ्या काही पाश्चिमात्य देशांतील लोकांनी स्वीकारलेल्या आत्यंतिक पातळीवरील भोगवाद आणि चंगळवादाच्या पलीकडेसुद्धा त्यांच्यातील एक सुप्त आणि अदृश्य अशी गरज त्यांना गूढ अध्यात्माकडे खेचून नेते.

**मानवी जीवनातील ही अगतिकता आणि भीती यामुळेच तर धर्माचे अस्तित्व अबाधित राहत नाही ना?**

**References :**

01. Bertrand Russel : The Basic Writings of Bertrand Russel, Edited by Robert E. Egner & Lester E. Denonn.

02. Science & Religion I : Address : Princeton Theological Seminary, May 19, 1939.

03. Science & Religion II : Science, Philosophy & Religion, A Symposium, 1941.

04. Stanford Encyclopedia of Philosophy.

05. Stephen Hawking : Lecture at Caltech on April 16, 2013. : Title- "Big Bang Didn't Need God."



# 'धर्म' शब्दाचा मला अभिप्रेत अर्थ व धर्माची गरज

चेतन पंडित

मनुष्य हा सिविलाइझ्ड प्राणी आहे. (क्षमस्व, पण सिविलाइझ्ड या इंग्रजी शब्दा करता मला योग्य मराठी प्रती शब्द मिळाला नाही.) तर, सिविलाइझ्ड या शब्दात ज्या अनेक गोष्टी समावलेल्या आहेत त्यापैकी एक म्हणजे, इतर मनुष्यांबरोबर कसे वागावे याचे काही नियम मान्य करणारा. याच्या विरोधार्थी म्हणजे जंगल राज. प्रत्येकाला त्याच्या ताकदी प्रमाणे जे हवे ते करण्याची मुभा. तर, नागरी समाजात राहात असताना इतरांबरोबर कसे वागावे, काय करावे व त्याही पेक्षा महत्त्वाचे म्हणजे काय करू नये, याचे काही नियम, काही आदर्श पाळावे लागतात. हे नियम/आदर्श असे असतात कि, अमूक एक का करू नये याचे तर्कशुद्ध उत्तर देता येत नाही. उदाहाराणार्थ, पोटॅशियम सायनाईड खाऊ नये. कोणी विचारले, 'का खाऊ नये?' तर त्याचे तर्कशुद्ध, विज्ञान-आधारित उत्तर देता येते. पोटॅशियम सायनाईड विष आहे, जीव जाईल. नेमके काय होईल, जीव कसा जाईल, याचे पण तर्कशुद्ध, विज्ञाननिष्ठ उत्तर देता येते. आता याची तुलना करा - 'चोरी करू नये.' याच्या बरोबर करा. यावर कोणी विचारले 'का करू नये', तर त्याचे तर्कशुद्ध, विज्ञानआधारित उत्तर देता येत नाही. फार फार तर असे उत्तर देता येईल, की चोरी करणे कायद्याने गुन्हा आहे, पकडले गेल्यास शिक्षा होईल, इत्यादी. या वर जर प्रश्नकर्त्याने पुढे विचारले 'समजा पकडले न जाण्याची, शिक्षा न होण्याची खात्री आहे किंवा शक्यता अगदीच पुसट आहे, मग चोरी करायला काही हरकत आहे का?' या प्रश्नाला तर्कशुद्ध उत्तर देता येत नाही. चोरी करू नये याबाबत कोणाचे दुमत नसावे. पण चोरी का करू नये, याचे सोपे (आणि वैज्ञानिक) उत्तर नाही.

देव व धर्म या संकल्पनांचा जन्म या गरजेतून झाला असावा. (या चर्चेत मला 'धर्म' या शब्दाचा अर्थ अभिप्रेत आहे तो असा : 'आयुष्य जगत असताना ढोबळ मानाने काय करावे व काय करू नये या बाबतचे काही नियम किंवा आदर्श, ज्यांची उपज विज्ञानात नाही.' शेवटचे चार शब्द ज्यांची उपज विज्ञानात नाही हे महत्त्वाचे.) धर्माच्या नियमां प्रमाणे चोरी करणे हे 'पाप कर्म' या यादीत आहे. म्हणून चोरी करू नये. 'पाप' म्हणजे जे करू नये ते व 'पुण्य' म्हणजे जे करावे ते. काही 'पाप' कृत्यांची यादी असावी; जेणे करून लोकांनी 'पाप' यादीतील कृत्ये करण्याचे टाळावे. काही 'पुण्य' कृत्यांची यादी असली तरी ठीक, नसली तरी चालेल. ख्रिश्चन धर्मात 'दहा आज्ञा' आहेत तसे. असो. तर, धर्म व देव या संकल्पनेची उत्क्रांती काही 'पाप' कृत्यांची यादी, जेणे करून लोकांनी काही कृत्ये करण्याचे टाळावे, इथेच थांबली असती तर फार बरे झाले असते. दुर्दैवाने तसे झाले नाही, होत नाही. कारण आणखी प्रश्न पुढे येतच राहतात व त्यांना तर्कशुद्ध उत्तरे नसतात, म्हणून उत्तरे 'तयार करावी' लागतात.

मी स्वतःला पूर्णपणे विज्ञाननिष्ठ मानतो. पूजा वगैरे करीत नाही. तरी सुद्धा मला असे वाटते की धर्म व देव या दोन संकल्पनांची गरज आहे.

१ : मनुष्याला दुष्कृत्ये करण्यापासून परावृत्त करण्या करता प्रत्येक वेळी कायद्याचा धाक उपयोगी येत नाही. आज जिथे तिथे (CCTV) कॅमेरे लावावे लागतात. पाटी असते 'तुम्ही (CCTV) कॅमेऱ्याच्या निगराणीत आहात.' तरी पण असे किती (CCTV) कॅमेरे लावता येतील, याला मर्यादा आहे. 'देव' म्हणजे एक सर्वव्यापी, कुठेही असणारा (CCTV) कॅमेराच. त्याच्या धाकाने जगात दुष्कृत्ये पूर्ण बंद नाही झाली, तरी खूपच कमी होऊ शकतात.

२ : अनेकदा जीवनात ताण-तणाव येतात. धर्म व देव या संकल्पना ते सहन करण्यास मदत करतात. असे म्हणतात की, ३५,००० फूट उंचीवर विमान उडत असताना जर वैमानिकाने घोषणा केली– 'आपल्या विमानात मोठा

अनुक्रमणिका

तांत्रिक बिघाड झाला आहे व आपण जमिनीवर सुरक्षित उतरण्याची शक्यता नाही', तर भले भले नास्तिक एका क्षणात आस्तिक होतात, ज्या देवावर त्यांचा कधीच विश्वास नव्हता, त्या देवाची प्रार्थना करू लागतात.

माझ्या एका जवळच्या मैत्रिणीला वयाच्या पन्नासाव्या वर्षी तिला कॅन्सर झाला. तिने निकराची झुंज दिली, पण कॅन्सर जिंकला. कॅन्सरच्या आजारात ज्या शारीरिक यातना होतात त्या तर झाल्याच; पण कॅन्सरचे निदान होताच तिने भक्तिवेदांत (म्हणजे नक्की काय ते मला ठाऊक नाही) मध्ये स्वतःला बुडवून घेतले मी जवळून प्रत्यक्ष पाहिलेले आहे, अनुभवलेले आहे की, तिचे मानसिक क्लेश तरी बरेच कमी झाले. मी तिला भेटायला जात असे तेव्हा मी अत्यंत विचलित मनःस्थितीत असे; पण ती शांत असे. आयुष्यात मानसिक ताण कोणाला नसतात? माझे मानसिक ताण कमी करण्याकरता मला रोज अर्धा तास पूजा किंवा रोज Telmasartin 40 mg असा पर्याय असेल, तर मी निश्चितच रोज अर्धा तास पूजा हा पर्याय स्वीकारेन. पूजा करण्यापासून मला कोणीच थांबविलेले नाही. माझीच विज्ञाननिष्ठा त्याच्या आड येते व मी रोज Telmasartin घेतो.असो. तर, धर्म व देव या संकलपनेची उत्क्रांती काही 'पाप' कृत्यांची यादी, जेणे करून लोकांनी काही कृत्ये करण्याचे टाळावे, इथेच थांबली असती तर फार बरे झाले असते. (दुर्दैवाने तसे झाले नाही, होत नाही. कारण आणखीन प्रश्न पुढे येतच राहतात व त्यांना उत्तरे पण 'तयार करावी' लागतात.) का करू नये पाप? कारण देव शिक्षा देईल. कुठे असतो हा देव? आकाशात/सर्वत्र असतो. पण त्याला कसे कळेल कि मी पाप केले? तो सर्व शक्तीमान आहे व सर्व काही पाहत असतो. पण शेजारचे ते अमुक, ते तर उघड उघड जन्म भर पाप-कृत्ये करीत आले, त्यांना काहीच शिक्षा झाली नाही? मृत्यू नंतर ते नरकात जातील. नरक म्हणजे काय? नरक म्हणजे इहलोकी पाप कृत्य करणाऱ्यांना मृत्यु नंतर जिथे ठेवून शिक्षा देतात, ती जागा. आणि ते तमुक, ते तर जन्म भर पुण्य-कृत्य करीत आले, तरी त्यांना फार दुःख भोगावे लागले. ते का? त्यांनी मागच्या जन्मात पाप केले होते. त्याची शिक्षा या जन्मात मिळाली. वगैरे. हे सर्व प्रश्न, त्यांना उत्तर देण्या करता 'तयार केलेल्या' (manufactured) संकल्पना, त्यातून निर्माण होणारे आणखीन प्रश्न, यातून धर्माचे अवडंबर निर्माण होते. देवाच्या मनात काय आहे हे सामान्य माणसाला कसे समजणार? व सामान्य माणसाच्या मनात काय आहे हे देवाला कसे समजणार? त्या करता पुजाऱ्यांची गरज भासली. मग कर्म कांडे, वगैरे आले. हा पुढचा प्रवास झाला नसता तर फार चांगले झाले असते. पण तसे होणे शक्य नव्हते.

धर्माला वैज्ञानिक/तात्त्विक/ तार्किक अधिष्ठानाची, आधाराची व पाठबळाची जरूर नसते, आणि असू पण शकत नाही. त्याचप्रमाणे विज्ञानाला धार्मिक/ नैतिक अधिष्ठानाची, आधाराची व पाठबळाची जरूर नसते आणि असू पण शकत नाही. धर्म आणि तर्क हे mutually exclusive आहेत. आइन्स्टाइन याने देव किंवा धर्म याबाबत केलेल्या काहीतरी भाष्याचा दाखला देऊन धर्म व विज्ञान यांचे जबरदस्तीने लग्न लावण्याच्या मी विरुद्ध आहे. आईन्स्टाइन याने चक्क 'देव आहे' असे म्हटले असले, तरी त्यामुळे देवाचे असणे सिद्ध होत नाही. experimental proof होईपर्यंत theory of relativity मान्य केली गेली नाही, तिथे 'देव आहे' मान्य करण्याचा प्रश्नच येत नाही.

पण माझा जास्त विरोध आहे अंधश्रद्धांना. अंधश्रद्धा या धर्मातूनच उत्पन्न होतात असे नाही. आणि इथे अंधश्रद्धा निर्मूलना करता काम करणार्यांशी माझे वैचारिक मतभेद आहेत. हल्लीची बरीच अंधश्रद्धा – वास्तू, रेकी, फेंगशुई, टेरोट कार्ड, न्यूमरॉलॉजी, भृगुसंहिता – यांचा धर्माशी काहीही संबंध नाही. तरी लोक यांच्या मागे का धावतात. एवढेच नव्हे तर चांगले सुशिक्षित लोक याच्या नादी लागतात; का? याचे कारण समाजातील असुरक्षितता. माझे असे मत आहे की, अंधश्रद्धेविरुद्ध झगडणाऱ्यांनी पहिला टप्पा फक्त अंधश्रद्धा दूर करण्यापर्यंत, फारतर धर्म आचरणातील अवडंबर दूर करण्यापर्यंतच, ठेवावा. थेट देवाचे अस्तित्व नाकारण्यापर्यंत जावू नये.



# धर्म का टिकून आहे?

फ्रान्सिस आल्मेडा

धर्म आणि विज्ञान ही दोन्ही मानवी प्रज्ञेची अपत्ये आहेत. प्रज्ञेचा विकास झाल्यामुळे मानवास भूत-भविष्याची जाणीव, अज्ञाताची भीती, मृत्यूची भीती, सभोवतालच्या निसर्गाची भयावह अभिव्यक्ती व सर्व गोष्टींचे नियमन-निर्मिती ह्यांविषयीचे प्रश्न पडण्यास सुरवात झाली. त्या वेळी धर्माने बाळबोध उत्तरे पुरवत त्याची जिज्ञासापूर्ती करण्याचा प्रयत्न केला. पुढे ज्या प्रश्नांची उत्तरे धर्माने कल्पनेने दिली होती, ती विज्ञानाने प्रत्यक्ष पुराव्यांच्या आधारे द्यायला सुरुवात केली. परंतु धर्माने पुरवलेला मानसिक आधार देणे विज्ञानाला अजून जमलेले नाही. त्यामुळेच आजतागायत धर्म टिकून आहे.

धर्म टिकून राहण्याची कारणे पुढीलप्रमाणे सांगता येतील. १) अज्ञाताच्या भीतीवर सोपे तोडगे, २) सुखी जीवन जगण्याचे सोपे मार्ग, ३) जीवनातील दु:खांतून मुक्ती व मोक्षाचा मार्ग, ४) मृत्यूनंतरच्या जीवनाचे व आत्म्याच्या अमरत्वाचे आश्वासन, ५) मानवाच्या व विश्वाच्या निर्मितीचे हेतू व कर्ता याचे सोपे उत्तर. वरील कारणांचे निराकरण पुढीलप्रमाणे करता येईल.

१) विज्ञानाच्या विकासाबरोबर अज्ञाताच्या भीतीवर मात करणे शक्य झाले आहे. रोग कशामुळे होतात हे कळल्याने त्यांवर उपाययोजना करता येते. परंतु अजूनही ज्या क्षेत्रांत अपघाताची किंवा अपयशाची निश्चित कारणे माहीत झालेली नाहीत, अशा क्षेत्रांतील लोक धार्मिक कर्मकांडाच्या आहारी गेलेले दिसतात. उदा., व्यापारी, चित्रपट निर्माते, क्रीडापटू, मच्छीमार व छोटे शेतकरी इत्यादी. विज्ञान जसे प्रगत होईल, तशी भीतीची कारणे नाहीशी होतील.

२) सुखी जीवनासाठी पुरेसे उपाय विज्ञानाने शोधले आहेत. परंतु ही वैज्ञानिक माहिती सामान्य जनांपर्यंत पोचली तर त्यांना धार्मिक तोडग्यांची गरज भासणार नाही.

३) दु:खातून मुक्ती देण्याचे काम मोठ्या प्रमाणात वैद्यकीय विज्ञानाने केलेले आहे. हे सर्व उपाय लोकांना सहज उपलब्ध झाले तर नवस-सायास व गंडेदोरे आपोआप कमी होतील. जीवनातील दु:खातून कायमची मुक्ती किंवा मोक्ष ही कल्पना योग्य मनोवैज्ञानिक संकल्पना वापरून बदलता येईल.

४) मृत्यूनंतरचे जीवन आणि आत्म्याचे अस्तित्व या धर्माच्या अत्यंत लोकप्रिय कल्पना आहेत. कारण त्या माणसाला मृत्यूच्या भीतीवर उपाय सुचवतात. आपल्या सर्व जाणिवा नष्ट होणे, आपण घडवलेल्या, जीव लावलेल्या गोष्टी सोडून जावे लागणे, आपले आप्त-स्वकीय दुरावणे अशा सर्व गोष्टी दु:ख व भीती निर्माण करणाऱ्या आहेत. यावर उपाय धर्माने असा सुचविलेला आहे की, या जीवनानंतर अधिक चांगले शाश्वत जीवन आहे आणि ते उपभोगण्यास शरीर नसले तरी आत्मा टिकून राहतो. विज्ञान यासाठी मृत्यूनंतर काय होते, याचा शोध घेऊ शकते. त्यानंतर मृत्यूनंतरच्या जीवनावर व आत्म्याच्या कल्पनेवर कायमचा पडदा पडेल. विज्ञान मानवाला दीर्घायू करेल, हे आत्ताच दिसायला लागलेले आहे. तसेच संपूर्ण मानवी जाणिवा कंप्युटरसारख्या यंत्रात किंवा यंत्रमानवात संक्रमित करता आल्या, तर मानवी देहाशिवाय मानवाला अमर्याद जीवन जगता येईल. हेच विज्ञानाने धर्माच्या शाश्वत जीवन आणि आत्मा ह्या कल्पनांना दिलेले उत्तर असेल.

५) मानवनिर्मितीचा प्रश्न वेगवेगळ्या धर्मांत निरनिराळ्या सोप्या पद्धतींनी सोडविण्याचा प्रयत्न करण्यात आला होता. परंतु डार्विनच्या सिद्धान्ताच्या रूपाने विज्ञानाने अधिक तर्कसुसंगत रीतीने त्याचे उत्तर दिले आहे. खगोलशास्त्राच्या प्रगतीनंतर पृथ्वी कशावर आधारलेली आहे हा प्रश्न निकालात निघाला. विश्वनिर्मितीचा प्रश्नही प्रत्येक गोष्ट किंवा वस्तूच्या निर्मितीसाठी एक कर्ता असतो, ह्या मानवी अनुभवाशी निगडित आहे. भविष्यात हा प्रश्नही एखाद्या संकल्पनेतूनच सुटेल. त्यानंतर विश्वाच्या निर्मात्याविषयीचा प्रश्न उरणार नाही.

वरील कारणांव्यतिरिक्त, मानवाच्या अंगवळणी

अनुक्रमणिका

पडलेली कर्मकांडेही धर्म टिकून राहण्यास कारणीभूत ठरतात. मानवी संस्कृतीत मुलांना वाढविताना संस्कारांच्या नावाखाली काही गोष्टी त्यांच्या अंगवळणी पाडल्या जातात (कंडिशनिंग). त्यामुळे मोठेपणीही अनाहूतपणे विशिष्ट धर्माची, विवेकाशी विसंगत अशी कर्मकांडे आचरली जातात.

आधुनिक मनोविज्ञानावर आधारित आणि विवेकाशी सुसंगत अशा शिक्षणपद्धतीने मुलांना वाढविल्यास मोठेपणी तर्कविसंगत कर्मकांडांपासून त्यांना मुक्ती मिळेल.

मानवाच्या सुरुवातीच्या विकासात धर्माने त्याला दिशा दिली. आता वैज्ञानिक पद्धतीचा इतका विकास झाला आहे की, धर्मातील संकल्पनांचाही तपास वैज्ञानिक पद्धतीने करायला सुरुवात झाली आहे. त्यामुळे भविष्यकाळात आइनस्टाइनचा प्रसिद्ध विचार 'धर्म विज्ञानाशिवाय आंधळा आहे आणि विज्ञान धर्माशिवाय पांगळे आहे', प्रत्यक्षात उतरेल आणि धर्मही विज्ञानाच्या नजरेने पहायला शिकेल.



अनुक्रमणिका

# ‘धर्म आणि विज्ञान’ या विषयावरील चर्चासत्रासाठी संक्षिप्त टीप

सुगत दाभोलकर

‘धर्म आणि विज्ञान’ यांपैकी धर्म या विषयाबद्दलचे माझे ज्ञान तोकडे आहे. मी विज्ञानप्रेमी आणि विज्ञानाचा अभ्यासक असलो, तरीही विज्ञानाच्या तत्त्वज्ञानाविषयीच्या अभ्यासातील माझ्या कमतरतांची मला पूर्ण जाणीव आहे. असे असूनही ही टीप लिहिण्याचे कारण म्हणजे प्राज्ञपाठशाळेच्या या महत्त्वपूर्ण चर्चासत्रामध्ये माझ्या क्षमतेनुसार सहभागी होण्याची प्रांजळ भावनिक इच्छा. त्याचबरोबर काही मुद्दे जे अशा चर्चांमध्ये सहजपणे येत नाहीत आणि जे या चर्चासत्रामध्ये चर्चिले जावेत असे मला वाटते ते मुद्दे संक्षेपाने मांडावेत या उद्देशाने मी ही टीप लिहीत आहे.

विज्ञान आणि धर्म यांमधील सुसंगती व/वा विसंगती हे अनेक वर्षांपासूनचे कोडे आहे. विज्ञानाच्या प्रगतीने त्याची तीव्रता वाढत गेली आहे. माझ्या मते हे कोडे प्रत्येकाने स्वतःसाठी सोडवायचे असते. कारण, विज्ञान जरी वस्तुनिष्ठ असले तरी धर्म या संकल्पनेचा अर्थ प्रत्येकासाठी व्यक्तिनिष्ठ असतो. हे कोडे सोडवण्यासाठीच्या क्षमता या वैज्ञानिक दृष्टिकोणाच्या सखोल आकलनातून येऊ शकतात. पण या क्षमता विकसित करण्यासाठी सद्यःस्थितीतील विज्ञानशिक्षण अपूरे आहे.

या पार्श्वभूमीवर सर्व स्तरांवरच्या विज्ञान-शिक्षणातून वैज्ञानिक दृष्टिकोण, त्यामागचे तत्त्वज्ञान आणि त्याच्याही पुढे जाऊन जीवनाच्या विविध अंगांशी असलेला त्याचा संबंध जाणून घेण्याच्या व त्यावर स्वतःचा विचार मांडण्याच्या क्षमता विज्ञान-शिक्षणाद्वारे विकसित करणे गरजेचे आहे.

विश्वासंबंधीच्या अनेक प्रश्नांची — उत्पत्तीपासून उत्क्रांतीपर्यंत — उकल करण्यात विज्ञान मोठ्या प्रमाणात यशस्वी ठरले आहे. मूलभूत संशोधनातून विकसित झालेल्या तंत्रज्ञानाचा वापर कल्पनातीत गतीने वाढत आहे. वैज्ञानिक प्रगतीविषयीची माहिती सर्वांपर्यंत पोचवण्यात आपण यशस्वी ठरलो आहोत. बिग बँग थेअरी, जनुकीय तंत्रज्ञान, उत्क्रांतिवाद यांची तोंडओळख तरी आज बऱ्याच जणांना झालेली असते. परंतु वैज्ञानिक दृष्टिकोण आणि विज्ञानाचे तत्त्वज्ञान (Philosophy of science) यांविषयीचे ज्ञान शिक्षणामार्फत देण्यात आपण कुठेतरी कमी पडतो आहोत.

धर्म आणि विज्ञान याविषयीची चर्चा केवळ हस्तिदंती मनोऱ्यातील विचारवंतांपर्यंतच मर्यादित न राहता तिचे आकलन सर्वसामान्यांपर्यंत पोचणे गरजेचे आहे. त्यासाठी वैज्ञानिक दृष्टिकोण (आपल्या संविधानातील मूलभूत कर्तव्य) म्हणजे नेमके काय, कार्यकारणभाव तपासून पाहण्याची ही नेमकी काय पद्धत आहे, त्याचे फायदे कोणते आणि त्याच्या मर्यादा कोणत्या, वैज्ञानिक दृष्टिकोणाचा अंगीकार करण्यासाठी आवश्यक असलेल्या क्षमतांचा विकास या सर्वांचा अंतर्भाव – किमान प्राथमिक स्वरूपात – शालेय अभ्यासक्रमामध्ये झाला पाहिजे.

विज्ञानाच्या तत्त्वज्ञानातील प्रगती, वैज्ञानिक पद्धतीमार्फत नवज्ञाननिर्मितीच्या रुंदावलेल्या कक्षा, जाणवणाऱ्या मर्यादा आणि त्या मर्यादा ओलांडण्याचे किंवा विस्तारण्याचे चालू असलेले प्रयत्न यांचा अंतर्भाव किमान प्राथमिक स्वरूपात, पदवी आणि पद्व्युत्तर अभ्यासक्रमांमध्ये झाला पाहिजे.

यातूनच विज्ञान आणि धर्म यांमधील सुसंगती आणि विसंगती यांचा आपापल्या पातळीवर अर्थ लावण्याची क्षमता सर्वांमध्ये निर्माण होऊ शकेल, असे मला वाटते. त्या दृष्टीने काय करता येईल, याचा विचार होणे गरजेचे आहे.

माझा दुसरा मुद्दा याहून खूप वेगळा आहे. हार्वर्ड विद्यापीठातील मानसशास्त्र विभागाच्या स्टिफन पिंकर या विचारवंताने साइन्टिझम (scientism) याविषयी

ऑगस्ट, २०१३ मध्ये लिहिलेल्या लेखाने काही वाद निर्माण झाले होते. या लेखाच्या अनुषंगाने मी काही मते मांडणार आहे.

ज्या व्याख्यानांच्या पार्श्वभूमीवर हे चर्चासत्र आयोजित केले आहे. त्या व्याख्यानांमध्ये डॉ. अंतरकरांनी वैज्ञानिक दृष्टिकोणाशी सुसंगत अशा धार्मिक जीवनाची शक्यता व स्वरूप याविषयी विचार मांडलेले आहेत. चिकित्सक, संशयवादी, बुद्धिवादी वैज्ञानिक दृष्टिकोणाच्या कसोटीवर प्रचलित धर्म उतरू शकत नाही, ही त्यांची मांडणी मला मोठ्या प्रमाणात पटलेली आहे. 'मानवी जीवनाचे अंतिम साध्य काय?' रसेलने म्हटल्याप्रमाणे या अंतिम साध्यामध्ये शांती आणि समाधान यांना महत्त्वाचे स्थान असले पाहिजे. मग ही शांती शोधण्यासाठी वैज्ञानिक दृष्टिकोणाचा त्याग करून आध्यात्मिक, धार्मिक प्रेरणेच्या मृगजळामागे लागायचे का, हा डॉ. अंतरकरांनी उपस्थित केलेला प्रश्न महत्त्वाचा आहे. पिंकरचा लेख हा 'धर्म आणि विज्ञान' याविषयी प्रत्यक्षपणे लिहिलेला नसून तो विज्ञान आणि समाजशास्त्र (humanities) या विषयी आहे. परंतु त्यातील काही मुद्दे मला डॉ. अंतरकरांच्या या प्रश्नाच्या अनुषंगाने महत्त्वाचे वाटतात.

पिंकरच्या लेखातील एक परिच्छेद उद्धृत करतो. जाणीवपूर्वक त्याचे भाषांतर करण्याचे टाळले आहे. काही वेळा पारिभाषिक शब्द हे अधिक बोजड व अनाकलनीय होऊन जातात.

'The great thinkers of the Age of Reason & the Enlightenment were scientists. These thinkers - Descartes, Spinoza, Hobbes, Locke, Hume, Rousseau, Leibniz, Kont, Smith - are all the more remarkable for having crafted their ideas in the absence of formal theory and empincal data. The mathematical theories of information, computation, and games had yet to be invented. The words "neenone", "hermone", and "gene" meant nothing to them, when neading these thinkers, I often long to travel back in time and offer them some bit of twenty-first-century finishman suence that would fill the gap in their arguments or guide them around a stumbling block what would these Fausts have given for such knowledge? what would they have done with it?

We don't have to fantasize about this scinano, because we are living it. We have the works of the great thinkers and their heirs, and we have scientific knowledge they could not have dreamed of. This is an extraordinary time to for the understanding of human condition intellectual problems from antiquity are being illuminated by insights from the sciences of mind, brain, genes & evolution, Powerful tools have been developed to explore them, from the genetically engineered nearons that can be controlled with pinpaints of light to the mining of "big data" as a means of understanding how ideas propagate.'

भौतिकशास्त्रातील विश्वाच्या पसाऱ्यापासून जीवशास्त्रातील उत्क्रांतीपर्यंतच्या विज्ञानाच्या विविध शाखांमधील प्रगतीने आपल्याला हा विश्वास दिला आहे की, जगातील अधिकाधिक गोष्टी या वैज्ञानिक प्रगतीच्या मार्गाने ज्ञेय (intelligible) आहेत. ही ज्ञेयतेशी असलेली बांधिलकी आढ्यता नाही, तर वैज्ञानिक दृष्टिकोणाच्या मार्गाने मिळवलेल्या ज्ञानाने बळकट झालेला विश्वास आहे. हे सहजासहजी मिळालेले ज्ञान नाहीये, तर चिकित्सक, संशयवादी, बुद्धिवादी वृत्तीने मानवी बुद्धिमत्तेच्या मर्यादांवर मात करून, किंबहुना त्या मर्यादांची सीमा विस्तारून मिळवलेले हे ज्ञान आहे.

विज्ञानमार्गाने मिळालेली उत्तरे– जगाच्या निर्मितीबद्दल, मानवाच्या निर्मितीबद्दल, समाजरचनांच्या निर्मितीबद्दल, मृत्यूच्या कारणांबद्दल (उदाहरणार्थ, जीवजंतूंमुळे होणारे रोग, कॅन्सर)– ही कोणत्याही धर्माने दिलेल्या उत्तरांपेक्षा सरस ठरली आहेत. मानवी मन, वर्तन, मेंदूतील रासायनिक प्रक्रिया यांमधील संशोधनातून मानवी मनाचा ठाव घेणे अधिकाधिक शक्य होत चालले आहे. मग, विज्ञानमार्गाचा वापर करून बुद्धिवादी

विचारांमधून अंतिम शांती आणि समाधानासाठी मूल्यात्मक व आध्यात्मिक (spiritual) मांडणी करता येणार नाही का? त्यासाठी धर्माचा आधार घेण्याची गरज काय? जागतिक स्तरावर असे प्रयत्न चालू आहेत.














# धर्म आणि विज्ञान

विश्वास सहस्रबुद्धे

सध्या आपल्या देशामध्ये अतिशय विशिष्ट अशी परिस्थिती निर्माण झालेली आढळून येते.

एका बाजूला खूप आशादायक अशा नवनवीन गोष्टी घडून येत आहेत. गेल्या काही वर्षांत सामान्य माणसाचे जीवन खूपच सुखकर व्हावे अशा काही गोष्टी रूढ झालेल्या आहेत. फारसा विचार न करता सांगायचे तर एस टी, रेल्वे, विमाने यांची तिकिटे घरबसल्या कंप्युटरवर काढता येतात. मोबाईलच्या शोधामुळे तर आपले आयुष्य भलतेच बदलले आहे. देवीच्या रोगाचे निर्मूलन झालेले आहे. एका गावाहून दुसऱ्या गावी जाण्यासाठी महामार्ग आहेत, वीजमंडळाची, टेलिफोनची बिले अचूक येतात, तीही मेलवर. आपल्या बँकेतून बरोबर बिलाएवढेच पैसे वजा होतात. एटीएम मशीनमधून चक्क पैसे काढता येतात.

यादी खूप मोठी करता येईल.

दुसऱ्या बाजूला, मनात चिंता उत्पन्न व्हावी अशा अनेक गोष्टी घडत आहेत. सर्वत्र कायदा आणि सुव्यवस्था यांची पायमल्ली होताना आढळून येते. लोकसंख्येचा भस्मासुर एक अब्जाचा आकडा पार करून दीड अब्जाकडे वाटचाल करतो आहे. आरोग्य आणि शिक्षण यांसारख्या अत्यावश्यक गोष्टींमध्ये म्हणावी तशी आगेकूच होत नाही. स्त्रियांची परिस्थिती हा विषय कोणाही विचारी माणसाला अस्वस्थ करून सोडतो. आपला एक (आणि एकच) शेजारी देश आपल्याबरोबर सारखी भांडणे उकरून काढतो. तो आपल्याला घाबरवतो, म्हणून आपण त्याला घाबरवण्यासाठी प्रचंड पैसे खर्च करतो. दंगाधोप्यांमध्ये माणसांची नृशंस कत्तल होते. मोटारसायकलवरून लोक येतात आणि फिरायला निघालेल्या माणसांना गोळ्या घालतात आणि आरामात निघून जातात. विमाने आदळवून उत्तुंग इमारती जमीनदोस्त केल्या जातात.

याचीही यादी खूप मोठी होईल.

चांगल्या गोष्टी का घडून आल्या, याचे उत्तर सोपे आहे. जिथेजिथे विज्ञाननिष्ठ विचार केला गेला आणि तंत्रज्ञानाची मदत घेतली गेली, तिथे तिथे चांगल्या गोष्टी घडून आल्या याबद्दल प्रबळ बहुमत व्हायला हरकत नाही. मोठी धरणे चांगली का वाईट, अणुऊर्जा हितकारी का अहितकारी या वादात आपण शिरायला नको. विज्ञान शाप की वरदान प्रगती, सुख कशाला म्हणायचे या वादात मला शिरायचे नाही. खरे म्हणजे आम्हा सामान्य माणसांना ते चांगले ठाऊक आहे.

जिथे चांगल्या गोष्टी घडून आल्या नाहीत त्यामागचे कारण काय होते? पण असे काही विषय असू शकतात की, ज्याबद्दल ठामपणे 'हो! हे करायला हवे.' किंवा 'नाही! हे करता कामा नये.' यावर प्रबळ बहुमत व्हायला हरकत नाही. कारण, उदा., स्वच्छता पाळली जावी, गरोदर स्त्रियांची उत्तम काळजी घेतली जावी, इतपतच उघड मुद्दे मला अभिप्रेत आहेत. अशा विषयांवर किमान प्रबळ बहुमत व्हावे, अशी माझी अपेक्षा आहे. कारण आपण लोकशाही रूढ असलेल्या देशात राहतो. ज्या गोष्टी आपल्याला पटतात अशा गोष्टींबाबत मतभेदाला, विरोधाला आणि प्रसंगी हिंसक प्रतिक्रियेलाही सामोरे जाण्याची तयारी असायला हवी असे मला प्रामाणिकपणे वाटते. त्यामुळे, समलैंगिक संबंधांना मान्यता द्यावी का? स्त्रियांवर होणाऱ्या अत्याचारांना त्या स्वतः काही अंशी जबाबदार नव्हेत का? असे विषय आत्ता या क्षणी तरी मला अभिप्रेत नाहीत. पण एक सांगा, जर अमुक अमुक एक गोष्ट हितकारी आहे असे आपल्याला समजत असेल तर तिच्या मागे लागून ती करायला आपल्याला कोण थांबवू शकते?

वर विज्ञानवादी विचार असे मी म्हटले. बहुधा आम्हा सर्वांना याचा अर्थ व्यवस्थित माहीत आहे; पण संदिग्धता टाळण्यासाठी त्याचा अर्थ काय, हे पुढीलप्रमाणे मांडता येईल.

विज्ञान-- science-- म्हणजे आपल्या

अनुक्रमणिका








सभोवतालच्या विश्वाचे वस्तुनिष्ठ, तर्काधिष्ठित व अनुभवाधिष्ठित दृष्टिकोणातून आकलन करून घेणे. आपण सगळेच (अगदी प्राणी आणि वनस्पतीसुद्धा) हे दर क्षणी करत असतो. जन्माला आल्यापासून ते मरेपर्यंत. किंबहुना आपला मेंदू असाच विचार करण्यासाठी उत्क्रांत झालेला आहे. तुमचा कदाचित विश्वास बसणार नाही, पण अवैज्ञानिक विचार करणे तसे अवघड असते (हे अवघड काम आपण अनेकदा लीलया करतो, हेही तितकेच खरे आहे.) प्राणी आणि वनस्पती यांची गणना 'सुद्धा' या सदरात करणे अन्यायाचे आहे. त्यांना तर टिकून राहण्याकरता फक्त आणि फक्त वस्तुनिष्ठ, तर्काधिष्ठित व अनुभवाधिष्ठित दृष्टिकोणाचीच मदत होत असते, हे उघड आहे.

विज्ञानाची आकलनाची पद्धत पाच टप्प्यांची आहे.

१. निरीक्षण.

२. समान निरीक्षणे.

३. समान निरीक्षणांच्या आधारे उपपत्ती, गृहीतक किंवा सिद्धान्त मांडणे.

४. उपपत्तीचे समर्थन होऊ शकेल असे एकास एक असे कार्यकारणभावाचे गठन करणे व त्यासाठी सूत्र शोधणे. त्या सूत्राची काटेकोर चाचण्यांच्या, प्रयोगांच्या व पुराव्यांच्या आधारे छाननी करणे. जिथे या दोहोंची शक्यता नाही तिथे तर्काने व अन्य क्षेत्रातील बळकटी आणणाऱ्या– corroborating-- पुराव्याच्या मदतीने हे करणे.

५. सूत्राच्या आधारे भाकिते करणे.

वरील पद्धत बिनतोड म्हणावी अशीच आहे. त्यामध्ये 'मला असे वाटते म्हणूनच' ('च' हेतुतः म्हटले आहे.) असे म्हणायला जागा नाही. हां, 'मला असे वाटते बुवा' असे म्हणायला हरकत नाही. ही उपपत्ती झाली. पण तसे काही वाटते हे सांगण्याची जबाबदारी स्वीकारायला हवी. उपपत्ती प्रत्येक चाचणीला उतरायलाच हवी. अनेकदा, आधी जसे वाटते, तसे ते नसते, असे नंतर कळते. पण तसे घडल्यास, 'माझे बरोबर नव्हते', असे म्हणण्याचे धैर्य आणि तयारी या पद्धतीत आहे. वस्तुतः वैज्ञानिक विचार-पद्धतीची ही फार मोठी ताकद आहे आणि लोभसवाणी चारुताही. पण दुर्दैवाने, याला अपूर्णता अशा व्यंगोक्तीने हिणविले जाते.

वैज्ञानिक पद्धतीने स्वतःच्याच पायात अजून एक खोडा घातलेला आहे. तो म्हणजे, कोठलीही उपपत्ती 'बाधक्षम' (falsifiabile) असायला हवी, ती असिद्ध (disprove) करता यायला हवी. ही शर्त वरकरणी विचित्र वाटते. याचा थोडक्यात अर्थ असा आहे की, कधीकधी चाचण्या, प्रयोग व अन्य बळकटी आणणाऱ्या पुराव्यांनी प्रस्थापित झालेल्या उपपत्तीच्या विपरीत निरीक्षणे दिसून येतात. त्यामुळे ती उपपत्ती असिद्ध झाली, निदान सकृत्‌दर्शनी, असे म्हणणे प्राप्त होते. पण नंतर असेही आढळून येते की, जे विपरीत घडले आहे त्यालाही संयुक्तिक असे कारण आहे. उपपत्ती खरीच आहे किंबहुना, असे स्पष्टीकरण मिळाल्याने, खुंटा हलवून बळकट केल्याप्रमाणे, ती उपपत्ती खरोखरच खरी आहे, हे सिद्ध होते.

मुळात आकलन करून घ्यायचेच कशाला, हा प्रश्न मला सतावतो. कारण आपण विज्ञानाने केलेली प्रगती वगैरे जे काही म्हणतो, ते आपल्याला अद्याप न कळलेल्या गोष्टींच्या तुलनेत कस्पटासमान आहे. मुळात जेवढे कळले आहे, त्याच्या पल्याड न कळलेले नक्की आहे तरी किती, हेच आपल्याला ठाऊक नाही. पहिला जीव किंवा विश्व, हे कसे (किंवा का) निर्माण झाले, असा साधा प्रश्न मती कुंठित करायला पुरेसा आहे, भले प्रश्नकर्त्याला याचे उत्तर माहीत असो का नसो. 'तुला एव्हरेस्टच्या शिखरावर चढून जावेसे का वाटले?', या प्रश्नावर एडमंड हिलरीचे अजरामर उत्तर होते– 'कारण ते तिथे आहे म्हणून!' आकलन मुळात कशाला करून घ्यायचे, या प्रश्नाचे उत्तर हेच आहे. शास्त्रज्ञांना जिज्ञासेचा शाप असतो. त्यांना सारखे वाटत राहते– 'का बरे सगळ्या वस्तू धडाधड खाली कोसळतात? मग आकाशात दिसणारे तारे आणि ग्रह खाली कसे काय पडत नाहीत? कोणी नेऊन ठेवले असेल त्यांना तिथे? सूर्य गोलाकार आहे, चंद्र गोलाकार आहे, मग पृथ्वी चपटी असू शकेल?' हे सगळे देवाने केले, हे उत्तर त्यांचे समाधान करू शकत नाही. खरे म्हणजे याने कोणाचेच समाधान होत नाही. अगदी देव

मानणाऱ्यांचेसुद्धा. कारण तेही देवाच्या शोधात निघतात. हा दृष्टिकोणही परिपूर्ण वैज्ञानिक असाच आहे. शास्त्रज्ञांप्रमाणेच तेही आयुष्यभर प्रयत्न करतात. पण आजवर त्याबद्दल काही पटण्याजोगा वस्तुनिष्ठ पुरावा मिळालेला नाही. पण तरीही देव असला पाहिजे, असा त्यांचा विनापुरावा विश्वास असतो. आपल्याकडे, व्यक्तिशः पुरावा नसताना ठेवलेला विश्वास म्हणजे श्रद्धा.

विज्ञान ही मुळात एक पद्धत आहे, विचार करण्याची व काम करण्याची. यात निरपेक्षता, ताटस्थ्य, बुद्धिप्रामाण्य, चिकित्सा, नम्रता व विवेक या वृत्तींचा समावेश असणे अपेक्षित आहे. त्यामुळे समंजस व्यक्तीला या पद्धतीचा अस्वीकार करणे अवघडच नव्हे, तर अशक्य होऊन जाते. (मी या विधानाचा व्यत्यास मांडू इच्छीत नाही, हे नम्रपणे स्पष्ट करतो) तसेच श्रद्धा, पोथीनिष्ठा, ग्रंथप्रामाण्य, शब्दप्रामाण्य, आप्तवाक्य, पूर्वग्रह, आवडीनिवडी यांना या पद्धतीत स्थान नाही. या मुद्द्यावर थोडे स्पष्टीकरण आवश्यक आहे.

श्रद्धा हा शब्द आजकाल विवादास्पद झाला आहे. कोणी श्रद्धाळू असले तरी आणि नसले तरी, कोणाचे तरी ऐकून घ्यावेच लागते. खरे म्हणजे त्यात एवढे विशेष काय आहे? मीसुद्धा श्रद्धा ठेवतो. भले देवावर नसेल, पण मला हृदय आहे यावर माझी इतके दिवस श्रद्धाच होती. पण दोन वर्षांपूर्वी माझी ॲन्जियोग्राफी झाली तेव्हा समोरच्या पडद्यावर मला दिसत होते ते बहुधा माझेच हृदय होते. डॉक्टरांनीच तसे सांगितले. पण गॉल ब्लॅडरचे काय? मला गॉल ब्लॅडर आहे यावर माझी श्रद्धा आहे, असेच मला म्हटले पाहिजे. कारण परमेश्वरकृपेने मला माझे गॉल ब्लॅडर कोठल्याशा यंत्राच्या पडद्यावर पाहण्याची संधी किंवा पाळी अजून तरी आलेली नाही. तांत्रिक दृष्ट्या माझ्याकडे व्यक्तिशः त्यासाठी पुरावा कोठे आहे? मी माझ्या कारखान्यात काम करताना इंजिनियरिंग हँडबुक हाताशी ठेवत असे. मग याला ग्रंथप्रामाण्य किंवा पोथीनिष्ठाच म्हणायचे का? मी आज त्यावर विश्वास, नव्हे, श्रद्धा ठेवतो असे म्हणता येईल का?

या निमित्ताने श्रद्धा, शब्दप्रामाण्य, ग्रंथप्रामाण्य म्हणजे नक्की काय या संबंधाने स्पष्टता असावी, असे मला वाटते. आपण शाळा-कॉलेजमध्ये गुरुजनांकडून, डॉक्टरांकडून इत्यादी जे ज्ञान आणि माहिती मिळवतो, त्यालाही एका अर्थाने ग्रंथप्रामाण्य किंवा आप्तवाक्यप्रामाण्य म्हणता येईल; परंतु ते तसे का नाही, हे पुढीलप्रमाणे सांगता येईल. माणसाने आजवर आकलन करून घेतलेल्या गोष्टींचा समुच्चय खूप मोठा आहे. त्यामुळे पूर्वसूरींनी प्रयासपूर्वक सिद्ध केलेल्या गोष्टींचा पाया म्हणून वापर करून आजचा माणूस पुढे जातो. आम्हा माणसांच्या जगात एक स्वनिर्मित, स्वयंनियंत्रित व्यवस्था अस्तित्वात असते, जी या ज्ञानाची आणि माहितीची छाननी करत असते व पडताळा घेत असते. जे काही नवीन आकलन होते, ते एकाकडून दुसऱ्याकडे पोचवण्याचे काम हीच व्यवस्था करते. कधी आपल्याला त्याची किंमत मोजावी लागते, तर कधी आपल्याला ते मोफत मिळते. असेही अनेकदा घडते की, एखादी भ्रामक कल्पनाही या व्यवस्थेमार्फत प्रसृत होते. पण आजवरचा इतिहास बघता या व्यवस्थेने श्रद्धा ठेवायला सबळ कारण पुरविलेले आहे. आपण अनोळखी माणसाला बसस्टँडचा रस्ता कोणता असे सहज विचारतो आणि त्याने सांगितलेल्या रस्त्याने चालायला लागतो आणि हजारांतल्या नऊशे नव्याण्णव वेळा आपण बसस्टँडलाच पोचतो. 'पाचामुखी परमेश्वर' किंवा 'गतो महाजन पंथः' या उक्तीनुसार आम्हा प्रत्येकाला चाकाचा, आगपेटीचा आणि अमेरिकेचा शोध लावावा लागत नाही. पण काळाबरोबर पाच मुखांची आणि महाजनांची जागा शाळा-कॉलेजे, नकाशे, शोधनिबंध, चर्चासत्रे, परिषदा, संशोधन केंद्रे आणि प्रयोगशाळा इत्यादी यांनी घेतली आहे. यात सध्याच्या युगात इंटरनेट, वर्तमानपत्रे, टेलिव्हिजनवरील वाहिन्या यांचाही समावेश करायला हरकत नाही. सुरुवातीला ही व्यवस्था स्वनियंत्रित होती. पण काळाबरोबर या व्यवस्थेवर तज्ज्ञांचे नियंत्रण आले, ही चांगली गोष्ट झाली. (यात काही राजकारण्यांचीही समावेश असतो ही दुर्दैवाची बाब आहे )

पण असे असले तरीही आपल्याला ताक फुंकून पिणे म्हणजे काय, हे चांगलेच माहीत आहे. आपल्याला तेवढे डोके परमेश्वराने दिलेले आहे. त्यामुळे जेव्हा

आपल्याला पाचामुखी परमेश्वर आढळून येत नाही, तेव्हा आपण स्वतःच्या विवेकबुद्धीने आणि तार्किक विचाराने वागतो. आपली चूक कशी झाली हे शक्यतो इतरांना सांगतो. तेही आपल्यावर विश्वास, नव्हे, अचूक शब्दांत म्हणायचे तर श्रद्धा ठेवतात. तेव्हा श्रद्धा या शब्दाने कोणीच घाबरून जायचे कारण नाही. श्रद्धेशिवाय आपले भागणार नाही. अमेरिकेचे अपोलो अकरा हे यान चंद्रावर उतरले यावर श्रद्धा ठेवणे भाग आहे, असे मला तरी वाटते. अमेरिकन लोकांनी स्टुडिओमध्ये चंद्राच्या पृष्ठभागाचे नेपथ्य लावले, नील आर्मस्ट्राँग आणि एडविन आल्ड्रिन यांना स्पेससूट घालून चालायला लावले, त्याचे शूटिंग केले आणि ते स्लो मोशनमध्ये जगभर दाखविले, असे शपथेवर सांगणारे लोक मला भेटले आहेत. पण हीसुद्धा श्रद्धाच आहे. पण जर श्रद्धा विश्वासात बदलायला फार वेळ लागला तर त्याबद्दल संदेहवादी, किमान अज्ञेयवादी भूमिका घेणे इष्ट ठरेल.

उपपत्तीसाठी जेव्हा भक्कम पुरावे, यशस्वी चाचण्या किंवा प्रयोग आणि अन्य विज्ञानशाखांमधील बळकटी देणारे पुरावे यांची जोड मिळते, तेव्हा ती सूत्रबद्ध करण्याचा मार्ग मोकळा होतो. मुळात हे विश्व काही मूलभूत नियमांनुसार चालते. त्यात यादृच्छिकता नसते. आपण त्या नियमांपर्यंत पोचलो की, भाकित करणे शक्य होते. अर्थात हे सांगायला सोपे आहे; पण प्रत्यक्षात ते घडून यायला कठोर परिश्रम, भ्रष्टाचारापासून मुक्त व वस्तुनिष्ठ विचार आणि चुका स्वीकारण्याची तयारी अशा अनेक गोष्टी जुळून याव्या लागतात. तिथे व्यक्तिनिष्ठेला थारा नाही. 'आम्ही केले, आम्हाला जमले/कळले/अनुभवास आले, तुम्ही करून बघा, तुम्हालाही जमेल/कळेल/ अनुभवास येईल', असा युक्तिवाद चालत नाही. हे कोणातरी अतिमानवी, अलौकिक अशामुळे घडले असेल, असे कधीही म्हटले जात नाही. आपण यापूर्वी म्हटले तसे काही वेळा भाकिते चुकतात; पण त्यामागची कारणे शोधली म्हणजे सापडतात, असा अनुभव आहे. पण त्यामुळे अजून काही जास्तीचे आकलन होते. दाभोलकरांच्या शब्दांत हा तिमिरातून तेजाकडे प्रवास आहे.

विज्ञानाच्या क्षेत्रात भ्रष्ट लोक असूही शकतील. त्यांच्यातही अनुचित ईर्षा, स्पर्धा, हेवेदावे असू शकतील. अखेर तीही माणसेच आहेत. पण त्यामुळे विज्ञानाला पद्धत म्हणून डाग लागत नाही.

आता धर्म या गोष्टीबद्दल काही ऊहापोह करणे इष्ट ठरेल. प्रथम एक गोष्ट स्पष्ट होणे आवश्यक आहे की, या चर्चेत कोठलाही विशिष्ट धर्म अभिप्रेत नाही ना धर्म या संकल्पनेबद्दल अनादर व्यक्त करण्याचा काही हेतू. जगातील सर्व जनसमूहांमध्ये धर्म या गोष्टीचा कोठल्या ना कोठल्या स्वरूपात आढळ होताना दिसून येतो. त्यामुळे त्यात प्राचुर्याने दिसून येणाऱ्या साधारण लक्षणांच्या मदतीने धर्म या गोष्टीचे स्वरूप समजून घेण्याचा हा प्रयत्न आहे. ही लक्षणे परस्परभिन्न पण सामूहिक दृष्ट्या निःशेष किंवा सर्वंकष (mutually exclusive but collectively exhastive) अशी दिसून येतील.

निःसंदिग्धता टाळण्यासाठी धर्म या शब्दाचा नेमका अर्थ सुनिश्चित करणे आवश्यक आहे. उदा., मित्रधर्म, धर्मपत्नी, धर्मपंथ, धर्मशिला, धर्मसंतती, धर्माचा काटा, धर्माची गाय, धर्मासन, धर्मोपदेश इत्यादी शब्दांचा नेमका अर्थ संदर्भाने लावावा लागतो. यात नोंद घेण्याची गोष्ट ही की, हे अर्थ अगदीच वेगळे असतात. उदा., जीवनशैली, स्वभाव, कर्तव्य, वृत्ती, कायदा, नीती इत्यादी. पण आज जेव्हा आपण व्यवहारात धर्म हा शब्द वाच्यार्थाने वापरतो, तेव्हा त्याचा अर्थ काय होतो हे आम्हा सर्वांना माहित आहे. ज्या अर्थाने religion हा शब्द रूढ आहे, त्या अर्थाने मराठीत धर्म हा शब्द आपण सहसा वापरतो असे म्हणता येईल.

तरीही शब्दांचे रूढ वाच्यार्थ समजून घेणे उपयुक्त होईल. या साठी शब्दकोश हा उत्तम स्रोत आहे (मोल्सवर्थ शब्दकोश).

जशी विज्ञानाची विचार आणि काम करण्याची वैशिष्ट्यपूर्ण पद्धत असते, तशीच धर्माचीही असते. त्यांना आपण अनुक्रमे वैज्ञानिक दृष्टिकोण आणि धार्मिक दृष्टिकोण असे म्हणू. जसे विज्ञानक्षेत्रात शास्त्रज्ञ तसे धर्माच्या क्षेत्रात धर्मशास्त्री असतात. हे दोघे आपापल्या क्षेत्रात आपापल्या पद्धतीनुसार आचारविचार करत असतात. प्रश्न असा आहे की, हे दोन्हीं दृष्टिकोण

परस्परविरोधी आहेत किंवा कसे? आपण यापूर्वी वैज्ञानिक दृष्टिकोणाची लक्षणे बघितली. आता धार्मिक दृष्टिकोणाच्या लक्षणांचा विचार करणे योग्य होईल.

धार्मिक दृष्टिकोण म्हटले की, पुढीलपैकी एका, अनेक किंवा सर्व गृहीतकांचा आढळ झालेला दिसून येतो :

अलौकिकावर/देवावर श्रद्धा; देवाचा प्रेषित व देवाने त्याला दिलेले ज्ञान ज्यात गतित झाले आहे, असा ग्रंथ; ग्रंथप्रामाण्य मानून त्याप्रमाणे आचार-विचार केल्यानेच माणसाला ऐहिक जीवनात सुखाची खात्री होऊ शकते, अन्यथा जीवन दुःखमय होते; आत्मा, मरणोत्तर अस्तित्व, पुनर्जन्म, सूक्ष्म शरीर, शरीराचे पुनरुत्थान, अवतार, कर्मसिद्धान्त यावर श्रद्धा; माणसाच्या जीवनाचे ध्येय म्हणजे मुक्ती, ईश्वरदर्शन,आत्मज्ञान, निर्वाण, इत्यादी.

माणसाच्या आयुष्यात धर्म या संकल्पनेचा उद्भव का झाला असावा, याबद्दल अनेक मते असतात. त्यांपैकी काही प्रमुख पुढीलप्रमाणे नोंदविता येतील : माणूस नेहमीच भीती, काळजी, झगडा, कामक्रोधादी विकार यांनी पिडलेला असतो. त्याच्या आयुष्यात प्रेम, करुणा आणि समवेदना या अभावानेच दिसून येतात. माणसाच्या पीडा आणि त्याच्या आयुष्यातील कमतरता दूर करण्याचे आश्वासन धर्म देतो. धर्माच्या पुरस्काराने माणसाला नवजीवन प्राप्त होते. अर्थात ही कारणे सर्वंकष नव्हेत तर प्रातिनिधिक आहेत. ही कारणे आपल्या आदिम पूर्वजांच्या बाबतीतही लागू होतो. आपल्याला आज आहे, तशी त्यांना तंत्रज्ञानाची जोड नव्हती. कोठल्याही अनाकलनीय अशा घटितामागील कार्यकारणभाव न उमगल्यामुळे त्याच्यावर कोणा मानवसदृश मध्यस्थाचे आरोपण करणे हा एकच तर्क त्याच्याकडे उपलब्ध होता.

धर्म या गोष्टीचे मूळ अलौकिकावरील श्रद्धेमध्ये आहे. त्यामुळे धर्म या गोष्टीचा उहापोह करताना असे काही अलौकिक, अतिमानवी, सर्वज्ञानी आणि सर्वव्यापी –लघुरुपात–देव या गृहीतकाची चिकित्सा करणे भाग आहे.

आपण धर्म या शब्दाचा तीनकलमी अर्थ घेणार आहोत. देवाचे अस्तित्व मानणे, त्याच्या प्रेषिताला मानणे, आणि ग्रंथांना शब्दशः प्रमाण मानणे. देव असणे हे गृहीतक असिद्ध करणे शक्य नाही, हे सुरुवातीलाच सांगून टाकलेले बरे. मग चर्चा कशाला? तर देव हे गृहीतक सिद्धही करता येत नाही हेही सांगणे गरजेचे आहे. म्हणून चर्चा करणे भाग आहे. विज्ञानात संभवनीयता (Probability) संकल्पना असते. कोठल्याही घटनेचे स्पष्टीकरण देताना जेव्हा त्यामागील कारणे उघड नसतात तेव्हा आपल्याला संभवनीयतेकडे वळावे लागते. उदा., जीवोत्पत्ती आणि विश्वाची उत्पत्ती या दोन घटना अशा आहेत की ज्याचे स्पष्टीकरण देता न आल्यामुळे ती देवाने केली अशा आपसूक निष्कर्षाप्रत लोक येतात.

अजून एक अत्यंत लक्षवेधी घटित असे आहे ज्याच्या रहस्याचा उलगडा करण्यात माणसाला यश मिळाले आहे. ते घटित आहे. जीवशास्त्रीय उत्क्रांती, आज आपल्या सभोवताली वैविध्यपूर्ण असे प्राणीजगत आणि वनस्पतीजगत पसरले आहे. पूर्वापार आपण असेच समजायचो की, हे सारे देवाने आरेखित (design) केले, निर्माण केले आणि त्याचा प्रतिपाळही तोच करतो. याला आपण आरेखनवाद (creationism) असे म्हणू शकतो. या विचारसरणीनुसार सृष्टीतील एकेक प्रजाती एक एक करून घडविली. जगातील विविध धर्म आणि पंथांमध्ये या अर्थाच्या आख्यायिका रूढ आहेत. अर्थात, पूर्वीच्या काळी. त्यात फारसे चूक वाटण्यासारखे नव्हते. पण एकदा का आरेखनवाद स्वीकारला की देव काय काय करू शकतो, या तर्काला सीमाच उरली नाही. कशाचेही स्पष्टीकरण देता येत नसेल, तर देव हा एक आपसूक पर्याय उपलब्ध होताच.

पृथ्वीवर जिथेजिथे म्हणून माणसे होती, तिथे तिथे देव किंवा देवसश गोष्टीचे गृहीतक स्वतंत्रपणे मांडले गेले. पण मुळात या साऱ्यामागे आहे. कोणी तरी मानवसदृश अधिभूत (entity) आहे हे गृहीतकच बिनबुडाचे असल्याने त्याला वाटेल तसे फाटे फुटत गेले. त्यातून अनेकेश्वरवाद, एकेश्वरवाद असे देव या गृहीतकाचे विविध पाठभेद उत्क्रांत होत गेले. त्यातल्या काही चतुर लोकांनी स्वतःकडे देव आणि माणसे यांच्यातील

मध्यस्थाची भूमिका घेतली. मानववंशशास्त्रज्ञांनी यावर पद्धतशीर पाहणी करुन निष्कर्ष काढले आहेत. एकूण काय, देव असतो ही श्रद्धा फोफावत गेली. मी परत सांगतो. त्यात चूक काहीच नव्हते. दुसरा इलाजच काय होता?

पण १८५९ साली चार्ल्स डार्विनने नैसर्गिक निवडीतून उत्क्रांतीची उपपत्ती मांडली आणि सर्वकाही बदलून गेले. तोवर भौतिक शास्त्रानेही अनेकानेक रहस्यांचा पर्दाफाश केला होता. डार्विनने मांडलेल्या उपपत्तीला अर्थातच कडव्या परीक्षणाला आणि विरोधाला सामोरे जावे लागले. पण त्याने दिलेली कारणमीमांसा आजवरच्या सर्वांपेक्षा भव्य आणि सफाईदार आहे. गेल्या दीडशे वर्षांत अनेकांनी पर्यायी उपपत्ती मांडण्याचे आटोकाट प्रयत्न केले, पण विज्ञानाच्या कठोर चाचणीवर एकही उतरू शकली नाही. उलट, त्याच्या उपपत्तीच्या आधारे जीवसृष्टीतील अनेक कोडी उलगडता आली. जेम्स वॉटसन आणि फ्रान्सिस क्रिक हे आधुनिक मॉलिक्युलर जीवशास्त्राच्या क्षेत्रात क्रांती घडवून आणणारे प्रतिभाशाली शास्त्रज्ञ. १९५३ साली या दोघांनी जनुकशास्त्राची पायाभरणी केली. त्यामुळे आनुवंशिकता या क्षेत्रात मोठीच क्रांती झाली. या दोघांना मॉरीस विल्किन्स या शास्त्रज्ञासमवेत १९६२ सालचे Physiology or Medicine क्षेत्रासाठी असलेले नोबेल पारितोषिक मिळाले होते. त्याच्या संशोधनाचा विषय होता, "Molecular Structure of nucleic acids and its significance for information transfer in living material" डार्विन आणि वॉटसन व क्रिक यांच्या यशसिद्धीमुळे देव हे गृहीतक अजून डळमळीत होऊ लागले. अर्थात धर्मसंस्थांना हे मुळीच मान्य नव्हते. त्यांनी आरेखनवादाचा पुरस्कार हिरिरीने चालूच ठेवला.

डार्विनच्या यशसिद्धीचे सर्वात मोठे उपकार हे आहेत की, त्यामुळे माणसाची समज वाढली. (It raised our consciousness) आपल्या सहजभावाला जे वाटते त्यापेक्षा काही वेगळे असू शकते, ही शक्यता जोमाने वाढीस लागली. खरे म्हणजे डार्विनचे क्षेत्र जीवशास्त्राचे. त्याने मांडलेल्या उपपत्तीने जीवशास्त्राच्या क्षेत्रातील परिकल्पनेच्या भ्रामक गृहीतकाच्या ठिकऱ्याठिकऱ्या उडवल्या. इतकेच नव्हे तर भौतिकशास्त्राच्या आणि अंतराळशास्त्राच्या क्षेत्रातही असे भ्रामक गृहीतक मांडले जात असेल, तर त्यापासून सावध राहण्याचा इशारा दिला. जेव्हा लिओनार्ड सस्किंड या भौतिकीशास्त्रज्ञाने असे म्हटले की, 'मी काही इतिहासकार नव्हे पण माझा असा कयास आहे की आधुनिक अंतराळशास्त्राची खरी सुरुवात डार्विन आणि वॅलेस यांच्यानंतरच झाली. कारण या दोघांनीही आपल्या अस्तित्वामागील स्पष्टीकरण देताना पारलौकिक मध्यस्थांना संपूर्ण नकार दिला. डार्विन आणि वॅलेस यांनी केवळ जीवशास्त्रांचीच नव्हे तर अंतराळशास्त्राचीही मानके ठरवून दिली.'

अजूनही प्रथम जीवाची उत्पत्ती आणि विश्वनिर्मिती या कोड्यांबद्दल निर्णायक निष्कर्ष बाकी आहेत. वर म्हटल्याप्रमाणे गणिती संभवनीयतेच्या आधाराने यावर शास्त्रज्ञांचे अथक प्रयत्न जारी आहेत. खरे म्हणजे त्याबद्दल काही ऊहापोह करणे आवडले असते. मात्र स्थलमर्यादेमुळे ते करता येणार नाही. तरीही देव या गृहीतकाला आधार असलेल्या या दोन कोड्यांबद्दल काही मुद्दे मांडता येतील.

*प्रथम जीवाची उत्पत्ती ही असाधारणतः असंभवनीय असलेली घटना आहे. पण ती अशक्यकोटीतील नाही. उद्या रासायनिक प्रयोगशाळेत शास्त्रज्ञांनी जीव तयार केला तर आश्चर्य वाटायला नको.

*'ज्या अर्थी आपण आहोत, आणि याबद्दल विचार करू शकतो आहोत, त्या अर्थी पृथ्वी हा एक असा ग्रह आहे की, जो जीवोत्पत्तीसाठी पोषक आहे.' यालाच मानवकेंद्री तत्त्व (Anthropic principle) असे म्हणतात. यावरून जीवोत्पत्तीसाठी पोषक असणे म्हणजे काय यावर विचार करणे शक्य आहे. विश्वात अंदाजे - कमीतकमी - एक अब्ज अब्ज इतके ग्रह आहेत. दर एका अब्जास एक इतकी अत्यल्प संभवनीयता गृहीत धरूनही सुमारे एक अब्ज ग्रहांवर जीवसृष्टी असण्याची संभवनीयता असू शकते.

थोडक्यात, देव असण्याची शक्यता पूर्णतः असिद्ध करता आली नाही तरी त्याची संभवनीयता अत्यंत अल्प आहे, असे म्हणता येते. देव हे गृहीतक धर्माचा पाया आहे. त्यामुळे इतकी अल्प असंभवनीयता असलेल्या

गृहीतकावर धर्मव्यवस्थेची इमारत उभी आहे. अर्थात, देवाचे अस्तित्व हे वैज्ञानिक गृहीतक आहे अशा अनुमानावरून आणि वैज्ञानिक विचारसरणीवर आधारित असा हा निष्कर्ष आहे हे वेगळे सांगावयास नको. यावर मतांतरे होणे अगदीच संभाव्य आणि स्वागतार्ह आहे. हे दोन वेगळे विचार आहेत आणि त्यांचे मंडन निकोप वृत्तीने व्हायला हवे. त्यामुळे शत्रुत्वाची भावना निर्माण होऊ नये, हे मी अतिशय प्रामाणिकपणे आणि नम्रपणे सुचवू इच्छितो.

संस्कारक्षम वयात आपण सारेच धार्मिक संस्कारांना आपसूक सामोरे जातो. त्यातूनच धार्मिक दृष्टिकोणाची जडणघडण होत जाते. संस्कारक्षम वयातील मुलांना आणि युवकांना वैज्ञानिक दृष्टिकोणही उपलब्ध होणे गरजेचे आहे. मग ते ठरवतील, कोठला दृष्टिकोण त्यांना जास्त भावतो, धार्मिक का वैज्ञानिक.

वरील विचारधनातील खूप सारे डॉक्टर रिचर्ड डॉकिन्स यांच्या 'God Delusion' पुस्तकातून मिळाले असल्याचा मी ऋणनिर्देश करतो.

अंतिमतः वरील विवेचनाचा सारांश सूत्ररूपात आणि डॉकिन्सच्याच शब्दांत मांडून लेखनसीमा करतो.

* देह नष्ट झाल्यावर मागे आत्मा वगैरे असे काहीही उरत नाही.

* चमत्कार नसतात. याला अपवाद फक्त अशा नैसर्गिक घटनांचा, ज्यांच्या मागील कार्यकारणभाव आपल्याला अजून उमजलेला नाही.

* जर, आपल्याला ज्याची उमज पडत नाही असे सकृद्दर्शनी अलौकिक असे काही आढळले तर आपण अशी आशा करू की, केव्हा ना केव्हा त्याची आपल्याला उमज पडेल आणि त्याची गणना नैसर्गिक घटितांमध्ये होईल.

*या प्रक्रियेमध्ये, त्या गोष्टीची अद्‌भूतता, जसे इंद्रधनुष्य उमटण्याचे रहस्य उलगडले असले, तरी आजही ते अद्‌भूतच वाटते, तशीच कायम राहील.



## लेखकांचा परिचय

❋ **श्री. अतीश दाभोलकर**

हे सैद्धान्तिक भौतिक-शास्त्र या विषयाचे अभ्यासक असून पॅरिस मधील सोरबोन विद्यापीठात काम करतात. आय्. आय्. टी. कानपूर येथून पदव्युत्तर शिक्षण घेतल्यानंतर ते प्रिन्सटन विद्यापीठातून त्यांनी विद्यावाचाचती ही पदवी घेतली. अनेक विद्यापीठातून व संशोधन संस्थातून त्यांनी प्राध्यापक पदावर काम केले आहे. शांतिस्वरूप भटनागर पुरस्काराचे मानकरी.

atish.dabholkar@gmail.com

❋ **गीताली वि. मं.:शिक्षण : एम. एस. सी., पी. एच. डी.**

व्यवसाय : निवृत्त प्राध्यापक - रसायनशास्त्र, फर्ग्यूसनकॉलेज, पुणे. सामाजिककाम: प्रौढशिक्षण, पर्यावरणरक्षण, स्त्रीसबलीकरण, स्त्री-पुरुष समता आणि नर्मदा बचाव आंदोलन. संपादक/सहसंपादक: पालकनीती, मिळून साऱ्याजणी, पुरुषस्पंदन. पुरुषउवाच दिवाळी अंक, स्त्री चळवळ आणि राजकारण : समतेसाठी सत्तासंघर्ष. वरील विषयांसंदर्भात लेखन व अनुवाद.

http://www.miloonsaryajani.com दूरध्वनी : (०२०) २५६५२३२४

❋ **डॉ. राजेंद्र प्रभुणे**

स्त्री-आरोग्य-तज्ज्ञ, संपूर्ण आरोग्य, जीवनशैली, तणावमुक्ती, किशोरवयीन मुलांच्या समस्या, विवाहपूर्व-विवाहोत्तर समस्या इ. विषयांवर सल्ला, मार्गदर्शन, समुपदेशन, व्याख्याने व लेखन. लेखक: मराठी विश्वकोशात वैद्यकीय विषयांवर लेखन व कादंबऱ्या

rajendraprabhune@yahoo.co.in, भ्रमणध्वनी : ९४२३०३३७५१.

❋ **श्री. शरद अभ्यंकर**

बुद्धीप्रामाण्यवादी सामाजिक कार्यकर्ते, लेखक.

drsharadabhyankar@gmail.com भ्रमणध्वनी : ९४२२४००६४३

❋ **श्री. रविंद्र गोडबोले**

माजी संचालक - अक्वेरिअस टेक्नोलोजीज देशमुख आणि कं. प्रकाशनचे माजी प्रकाशक. इंद्र, वेदांचा अर्थ, अकबर, औरंगजेब, महाभारत इ. विषयांवर लेखन

Website: www.aquariustech.net

ravindragodbole@aquariustech.net ०२० २४२२५२०४, ९८२२००७६५५

❋ **प्रा. रमेश पानसे**

प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ. काही वर्षे अर्थशास्त्राचे पदव्युत्तर स्तरावरील प्राध्यापक, ग्राममंगल संस्थेकरवी आदिवासी भागात व अन्य ठिकाणी शिक्षणविषयक प्रयोग, आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व साहित्य विषयावर विपुल लेखन, सुमारे ३० पुस्तके व ५०० च्या वर लेख.

***पत्ता :–*** ३१५, प्राज्ञपाठशाळा मंडळ, गंगापुरी, वाई ४१२ ८०३.

panseraesh@gmail.com भ्रमणध्वनी : ९८८१२३०८६९.

❋ **श्री. श. रा. बोटे**

पीएचडी. - सैद्धान्तिक भौतिकशास्त्र. प्राध्यापक, भौतिकशास्त्र विभाग, किसन वीर महाविद्यालय, वाई.

shashibote@rediffmail.com भ्रमणध्वनी : ९४२३८०३८९३

❋ **श्री. चेतन पंडित**

बी. टेक्. (ITI ), M. Tech हैड्रॉलॉजी (आयर्लंड) सभासद सेंट्रल वॉटर इंजिनिअरिंग सर्विसेस व नर्मदा कंट्रोल ऑथॉरिटी. आता निवृत्त. तज्ज्ञ सल्लागार व शिक्षक जलसंपदा अभियांत्रिकी.

❋ **श्री. फ्रान्सिस आल्मेडा**

सेवानिवृत्त उपप्राचार्य, होलीक्रॉसहायस्कूल, निर्मळ, वसई, जीवनविकासमंडळ, वसईच्या जीविकाविवेक मंचचे संस्थापक सदस्य. उपाध्यक्ष.

❋ **श्री. सुगत दाभोलकर**

एम एस्सी जैव-अभियांत्रिकी व नेटवर्क, एम बी ए - ह्युमनरिसोर्स मॅनेजमेंट. चेन्नई येथील 'हे' (Hay) विज्ञान संस्थेत विज्ञान शिक्षणासाठी डिजिटल साहित्य-निर्मितीचे काम. विज्ञान शिक्षणाच्या सिद्धान्तांचा अभ्यास.

dsugat@gmail.com भ्रमणध्वनी : ९६१९५०६६५९

❋ **श्री. विश्वास सहस्त्रबुद्धे**

इंजिनीअर - बी. ई. (इलेक्ट्रीकल); पी. जी. डी. बी. एम - ऑटोमेशन ॲप्लिकेशन पीएचडी - नाट्यशास्त्र; सध्या अभ्यासाचे विषय : वैज्ञानिक दृष्टिकोण, डॉ. रिचर्ड डॉकिन्स.

vishvas56@gmail.com भ्रमणध्वनी : ९८२३३६९६०५०२० दूरध्वनी : २४२६८३७५

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६८ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका

